


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका










# दीपावली

सप्टेंबर : १९५९ : वर्ष १५ वें

मूल्य १ रु.

अनुक्रमणिका


डांडिया रास
'घुमर नृत्य'
कच्छी घोडी
वळार नृत्य




## श्रेयनामावलि

*कलाकृति :* **मंगलमूर्ती** • भारतीय लोकनृत्यें राजस्थान.

*कथा :*

• **प्रभाकर पाध्ये**—भेट. • **रॉय किणीकर**—प्रतारणा. • **पद्माकर गोवईकर**—इसाक. • **सौ. अंजलि ठकार**—पांखरें. • **आनंद वर्टी**—रेघा.

*काव्य :*

• **शंकर वि. वैद्य** • **वृन्दा लिमये** • **सदानंद रेगे** • **मधुकर केचे.**

*ललित लेख :*

• **गोपाळकृष्ण भोबे**—ऋद्धि-सिद्धीचा नायक. • **पु. भा. भावे**—पाऊस आला पाऊस आला. • **पु. रा. बेहेरे**—हरिहर पुत्र. • **शां. शं. रेगे**- नवचित्रकार आणि प्रेक्षक

*रहस्यमय सत्यकथा :*

• **चंद्रसेन**—पुतळी.

*प्रवास वर्णन :*

• **अनंत काणेकर**—शोनांनच्या परिसरांत.

*वैचारिक लेख :*

• **जुन्यांतलें सोनें**—कै. ज. के. उपाध्ये. • **दीपमाळ**—पिनाकि, विष्णुशर्मा, गोपालन्, वारकरी. • **महाराष्ट्र दर्शन**—मराठ्यांची शौर्य परंपरा.

*सदरें :*

• परमेश्वर आणि मी—**दि. के. बेडेकर, सौ. ज्योत्स्ना भोळे, बाबुराव बागवे.**
• घातली ही पाणपोई—**वसंत सवनीस** • भाषा मराठीच—**दालदी भाषा.**
• स्फूर्तीची फुलें—**बाळ सामंत, मधु कर्णिक, उमाकांत कीर, श्रीकृष्ण ठाकूर.**



वर्ष १५ वें
सप्टेंबर १९५९

**दीपावली**—मासिक दर महिन्याच्या एक तारखेस प्रसिद्ध होतें.
संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०-४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२. या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं.







महाराष्ट्र हा शूरांचा देश. आमची वीरपरंपरा उज्ज्वल आहे. कीर्तिकौमुदी नांवाच्या एका महाकाव्यांत कवि सोमदेव यानें सिंघणानें गुजरातेवर केलेल्या स्वारीचें जें वर्णन केलें आहे तें या संदर्भात वाचकांना आजहि उद्बोधक वाटेल.

## मराठ्यांची शौर्य परंपरा

सिंघणाची फौज चाल करून येत आहे हें वर्तमान कळतांच गुजरातेची राजधानी दहशतीनें थरथर कापूं लागली. परचक्र येऊन हल्ला करणार ह्या भीतीनें त्या गुर्जर राजाच्या प्रजेंतून कोणीही नवीन घर बांधविण्यास आरंभ करीना, किंवा दाणादुणा सांठविना, आणि सर्व लोकांचीं मनें उद्विग्न झालीं. शेतांतील धान्याचें रक्षण करण्याची हेळसांड करून गाड्या मिळवण्याची सर्व लोक विलक्षण काळजी वागवितात असें दिसूं लागलें. आणि शत्रूची फौज जसजशी अधिकाधिक जवळ येऊं लागली तसतशी दहशत अतिशय वाढून लोक घरेंदारें सोडून दूर दूर पळून जाऊं लागले. यादव राजाचें तें असंख्य सैन्य फार त्वरेनें चाल करून येत आहे, हें वर्तमान लवणप्रसादच्या कानीं येतांच त्यानें त्रोधानें भिंवया चढविल्या, आणि त्याची फौज लहान होती तथापि, ती बरोबर घेऊन शत्रूची फौज फार मोठी असतांही तिला गांठण्याकरितां तो निघाला. सिंघणाचें सैन्य तापीच्या कांठीं पोहोंचलें तेव्हां, तो लवणप्रसाद त्वरेनें पुढें चाल करून महीच्या कांठीं गेला. एक तर शत्रूचें सैन्य अति मोठें, व दुसरें, त्या चालुक्याच्या फौजेचा पराक्रमही दुर्धर, हें पाहून लोक संदेहग्रस्त झाले, आणि पुढील परिणामाविषयीं त्यांचा तर्क चालेना. शत्रूंकडील लोक मार्गांतील खेडीं जाळीत त्यायोगें आकाशांत जो धुराचा लोट उठे, त्यावरून त्या भयत्रस्त लोकांस शत्रूंचा तळ कोठें आहे हें कळे, व त्या धोरणानें कोठें कसें रहावें किंवा जावें ह्या विषयीं त्यांस व्यवस्था करतां येई. यादवांनीं शेतांत विपुल आलेलीं पिकें जशींच्या तशीं उभी असतां भडोचच्या आसपासचा मुलुख हल्ला करून व्यापून टाकला. तथापि गुजरातच्या राजाला ते अजेय ( अजिंक ) आहेत असें वाटेना.

• •




घांस घेरे तान्ह्या बाळा । गोविंदा गोपाळा ॥



भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें : ७ **मंगलमूर्ति**

ॐकाररूपी भगवान् यो वेदादौ प्रतिष्ठितः ।
यं सदा मुनयो देवाः स्मरन्तीन्द्रादयो हृदि ॥
यं पूजयन्ति सततं ब्रह्मेशानेन्द्रविष्णवः ।
यो हेतुः सर्वजगतां सर्वकारणकारणम् ॥

— गणेश पुराण

ॐकारस्वरुपी गजानन असे जो आदि वेदांहुन
ज्या इंद्रादिक देव आणिक मुनी ध्यातात रात्रंदिन
ब्रह्मा, शंकर, इंद्र, विष्णु करिती ज्याचें सदा पूजन
विश्वा कारण सर्व तोच !—सगळ्या तो कारणां कारण

— शंकर त्रि. वैद्य

## या महिन्यांतील माननीय व्यक्ति

# चिंतामण द्वारकानाथ देशमुख

कर्तृत्व आणि भाग्य यांचं साहचर्य नेहमींच आढळून येत नाहीं. त्यामुळें केव्हां कव्हां अकर्तृत्ववान व्यक्तींच्या गळ्यांत बहुमानाचे हार पडत असतात आणि बुद्धिमान आणि कर्तृत्वशाली व्यक्ति अंधारांत राहातात.

पण सर चिंतामणराव द्वारकानाथ देशमुख यांची सारी गोष्टच न्यारी. असामान्य कारभारकौशल्यासाठीं असलेल्या १९५९ च्या रेमन मग्सेस पारितोषिकाचे एक मानकरी म्हणून त्यांची निवड झाली आहे. हें पारितोषिक म्हणजे आशियांतील नोबेल प्राइजच समजण्यांत येतें. फिलीपाईन्सचे दिवंगत अध्यक्ष रेमन मॅग्सेसे यांच्या स्मृत्यर्थ स्थापन झालेल्या निधीतर्फे हें पारितोषिक देण्यांत येतें.

सर चिंतामणरावांचा हा गौरव म्हणजे एकप्रकारें मराठी कर्तृत्वाचा गौरव. पण अशाप्रकारचे मानसन्मान आणि बहुमान चिंतामणरावांना मुळींच परके नाहींत. उलट असे मानसन्मान आपल्या असामान्य कर्तृत्वानं मिळविणं हा त्यांच्या आयुष्याचा स्थायीभावच झाला आहे.

१४ जानेवारी १८९६ रोजीं चिंतामणरावांचा जन्म झाला. त्यांचे वडिल द्वारकानाथपंत हे वकिल. पण चिंतामणरावांनीं वडिलांचा मार्ग अनुसरला नाहीं. आपल्या तीव्र बुद्धिमत्तेनें ते शाळेंत तर सदैव पहिले असायचेच पण मॅट्रिकच्या परीक्षेंत पहिला क्रमांक मिळवून राम गणेश गडकऱ्यांसारख्या थोर कवीकडूनहि त्यांनीं काव्यप्रशस्ती मिळविली. त्यानंतरचें चिंतामणरावांचें शिक्षण एल्फिन्स्टन हायस्कूल आणि एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें झालें. तेथून ते उच्च शिक्षणासाठीं केंब्रिज येथें गेले. १९१७ सालीं त्यांनीं बॉटनी या विषयाचें फ्रॅन्क स्मार्ट प्राईज मिळविलें आणि १९१८ सालीं बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाले. आणि त्याच वर्षी ते आय. सी. एस्. च्या परीक्षेस बसले. ही परीक्षा युरोपियन उमेदवारांनाहि खुली होती. पण याहि परीक्षेंत देशमुखांनीं आपला पहिला क्रमांक सोडला नाहीं.

त्यानंतर भारतांत त्यांनीं अनेक हुद्यावर कामें केलीं. १९२० ते २४ पर्यंत असिस्टंट कमिशनर म्हणून तर १९२४ ते २५ पर्यंत उत्तर प्रदेश सरकारचें अंडर सेक्रेटरी म्हणून त्यांनीं काम केलें. त्यानंतर मध्यप्रदेशमध्यें त्यांची सेटलमेंट ऑफीसर म्हणून नेमणूक झाली. १९३१ च्या दुसऱ्या गोलमेज परिषदेवरांवर सेक्रेटरी म्हणून त्यांना पाठविण्यांत आलें.

१९३३ ते ३९ च्या सहा वर्षांत त्यांनीं उत्तरप्रदेश सरकारच्या अर्थखात्याची जबाबदारी अत्यंत यशस्वीरीत्या पार पाडली. त्यानंतर देशमुखांची महत्त्वाची कामगिरी म्हणजे रिझर्व बँकेवरील त्यांची नियुक्ति. १९४१ ते ४९ या काळांत ते रिझर्व्ह बँकेचे गव्हर्नर होते. देशाच्या अर्थकारणाची घडी नीट बसविण्याबाबतचे फार मोठें कार्य देशमुखांनीं या नऊ वर्षांत पार पाडलें. त्यांच्या या कामगिरीचा गौरव म्हणून भारत सरकारनें १९४९ ते ५० मध्यें त्यांना युरोपमधील आपले आर्थिक प्रतिनिधि म्हणून नियुक्त केलें. या कालखंडांत देशमुखांच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव पाश्चिमात्य अर्थशास्त्रज्ञांवरहि पडला. आणि त्याचा परिणाम म्हणून भारतीयाच्या आयुष्यांत क्वचितच येणारा सन्मान त्यांच्या वाट्याला आला. १९५० सालीं त्यांची जॉइंट बोर्ड ऑफ गव्हर्नर्स ऑफ वर्ल्ड बँक ॲन्ड इंटरनॅशनल मोनेटरी फंड याचे अध्यक्ष म्हणून निवड करण्यांत आली. या उच्चपदीं अधिष्ठित होणारे देशमुख हे पहिलेच आणि शेवटचे भारतीय.

देशमुखांची आंतरराष्ट्रीय महति पं. नेहरूंनीं ओळखली आणि त्यांना १९५० सालीं नियोजनसमितीचे सभासद म्हणून निवडलें. आणि त्याच वर्षी भारत-सरकारचे अर्थमंत्रि म्हणून त्यांची नेमणूक करण्यांत आली. अर्थखात्यासारखें अति बिकट आणि जबाबदारीचें खातें तशा आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांच्यावर सोपवून नेहरूंनीं आपली गुणग्राहकताच व्यक्त केली.

देशमुखांचं सारं आयुष्य उच्चपदावर अधिष्ठित होण्यांत गेलं. १९२० सालीं त्यानीं विवाह केला तोहि एका आंग्ल युवतीशीं. त्यानंतर १९५३ सालीं त्यांचा दुसरा विवाह केला तोहि एका इतर प्रांतीय विदुषीशीं झाला.

पण इतकं असूनहि देशमुख अंतर्बाह्य महाराष्ट्रीयनच राहिले. महाराष्ट्राच्या मातीचा त्यांचा अभिमान सातासमुद्रापलीकडे जाऊनहि सुटला नाहीं. आणि म्हणून संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर महाराष्ट्रावर जाणूनबुजून अन्याय होत आहे हे पाहातांच त्यांनीं स्वाभिमानपूर्वक त्या उच्चपदाला लाथ मारली. आणि त्याप्रसंगीं निर्भीडपणें आपलें हृद्गत सर्वांच्या समोर खुलें करायला ते कचरले नाहींत. महाराष्ट्राचं तेजस्वी ब्रीद त्यांनीं राखलं.

आज त्यांचा आशियाई सन्मान म्हणजे एकपरीनें महाराष्ट्राचाच सन्मान अन् त्यामुळें आमचें अंतःकरण अत्यानंदानें आणि अभिमानानें उचंबळून येत आहे.

• • •

अनुक्रमणिका





श्रावण शके १८८१ सप्टेंबर १९५९

# ऋद्धिसिद्धीचा नायक। सुखदायक भक्तांसी ॥

सुखकर्ता, दुःखहर्ता, गणनायक गणेशाच्या जन्मासंबंधीं अनेक कथा प्रचलित आहेत. वराहपुराणांत आढळणारी गणेशजन्माची घटना बरीच निराळी वाटते.

वारंवार आपल्या मार्गांत येणाऱ्या विघ्नांचें निवारण कोणत्या उपायानीं करावें, अनंत काळपर्यंत युद्धें करून आटोक्यांत न येणाऱ्या दानवांचा कायमचा बंदोबस्त कोणत्या युक्तिनें करावा यासंबंधींचें एक भलें मोठें प्रश्नचिन्ह सर्व देवांसमोर उभें होतें; परंतु समस्या कांहीं सुटेना, वेदशास्त्र स्मृतींचा आधिपति विरंची, तो सुद्धां हतबुद्ध झाला होता, शेवटीं पाश, पितृप, पावक, पुरुहूत आदि सर्व देव, शतकोटीचें बीज बाचे उच्चारीत अर्धांगी पार्वतीसहीत ध्यानस्त असलेल्या श्रीशंकराजवळ आले, आणि त्यांनीं आपलें गाऱ्हाणें सांगितलें. महादेवांनीं निर्निमेष नेत्रानीं आदिमायेकडे पाहिलें, आणि त्याचवेळीं त्या रुद्राच्या मुखांतून परमतेजस्वी दैदिप्यमान असा एक युवक प्रगट झाला. त्याची दिव्य कांति आणि अलौकिक असें सौंदर्य पाहून देवलोकांतल्या सर्व स्त्रिया त्याच्यावर लुब्ध झाल्या. त्याचा भावी परिणाम आदिमायेनें ओळखला व रागानें तिच्या मुखांतून शापवाणी निघाली कीं "हे युवका तूं गजमुखी तथा लंबोदर होशील आणि सर्पांचं यज्ञोपवित सदैव अंगावर राहिल्यानें सामान्य स्त्री तुझ्याजवळ फिरकूंही शकणार नाहीं!" पार्वती दिलेला हा विनाकारण शाप महादेवांना सहन झाला नाह क्रोधाविष्ट होऊन त्यांनीं आपलें सारें शरीर घुसळलें· त्या घुसळण्य त्यांच्या रोमरोमांतून गजमुखी आणि करड्या रंगाचे असंख्य विनाय उत्पन्न झाले. सर्व ब्रह्मांड कांपूं लागलें, देव भयभीत झाले. विष त्यांनीं स्तुति करून महादेवांना शांत केलें. महादेवांनीं आपल मुखांतून उत्पन्न केलेल्या त्या पुत्राला या सर्व विनायकांचे सेनाप देऊन आशीर्वाद दिला कीं, यापुढें प्रत्येक शुभकार्यांत सर्वप्रथ तुझी पूजा केली जाईल. भाद्रपद शुद्ध चतुर्थीला ही गोष्ट घड म्हणून गणेश-चतुर्थी या नांवानें ती विख्यात आहे.

ब्रह्मवैवर्त पुराणांत–विवाहानंतर पार्वतीनें श्रीकृष्णाचें व्रत केल्य कारणानें तिला एक पुत्र झाला. या पुत्राला पाहायला सर्व देवांसमवे शनिदेवहि आले होते; परंतु त्यांनीं मान खालींच घातली होत त्याचें कारण पार्वतीनें शनिदेवांना विचारलें तेव्हां कारण सांगाय उचललेली मान गौरीला घातक ठरली. शनिदेवांची दृष्टी मुला पडली आणि मुलाचें शीर धडावेगळें झालें. श्रीविष्णूंनीं हत्तीचें श आणून मुलाला पुनर्जीवित केलें आणि मांगल्याच्या प्रथम क्षणीं तु पूजा केली जाईल असा त्याला वर दिला—अशी कथा आहे.

स्कंद पुराणांत गणेशाचा जन्म पार्वतीच्या अंगच्या मळापासू

झालेला आहे. तर कांहीं ठिकाणीं—पार्वतीनें आंघोळीला जातांना कापसाचा बाहुला करून अमृत दृष्टीनें त्याला सजीव केला आणि द्वाररक्षणासाठीं ठेवलें. इतक्यांतच महादेवाचें आगमन झालें. आणि उभयतांत युद्ध होऊन तो बाहुला जेव्हां महादेवानां आटोपेना तेव्हां आपल्या त्रिशुळानें महादेवानीं त्याचें शीर धडापासून वेगळें केलें. आणि फिरून पार्वतीचा हट्ट पुरविण्यासाठीं हत्तीचें शीर लावून त्याला सजीवही केलें. पतिपत्नीनीं अनेक वर देऊन देवांच्या देवांहूनही थोर असे पद त्याला दिलें, तोच हा मंगलमूर्ति मोरया, अशीही कथा सांगितलेली आहे. आदिदेव गणेशजींच्या मातृभक्तिपेक्षां पितृभक्तिच्या कथा ज्यास्त आहेत. महादेवानीं आपल्या भोळ्या स्वभावानें ओढवून घेतलेल्या संकटांचा परिहार या बुद्धीच्या नायकानें मोठ्या कुशलतेनें केलेला आहे. त्यासाठीं त्यांना कराव्या लागलेल्या विदूषकीपणाच्या गोष्टी वाचून आबाल वृद्धानां अनादिकालापासून खदखदून हंसवलेलें आहे; परंतु या भालचंद्राच्या जीवनांतली सर्वांत प्रमुख घटना म्हणजे महाभारताचें त्यानीं केलेलें लेखन. कृष्णद्वैपायनानीं ज्यावेळीं त्यांना लेखन सहाय्याची विनंति केली त्यावेळींही त्यांनीं आपल्या अभिजात विनोदबुद्धीला अनुसरून व्यासानां विलक्षण अट घातली. "मीं लेखन सहाय्य करतों; परंतू माझी लेखणी अडतां कामा नये" व्यासानीही आव्हानाच्या स्वीकार केला होता आणि दर १२५ श्लोकांनंतर एक कूटश्लोक सांगायचे आणि वक्रतुंड गणराज तो सोडवत बसायचे. त्या अवधींत पुनश्च १२५ श्लोक भारतीच्या महान आधार वडानें तयार करायचे. अशा गंमतींत महाभारत लिहून झालें.

केवळ भरतखंडाच्या संस्कृतींतच नव्हे तर संपूर्ण आशिया खंडांत गणपतीच्या मूर्तिच्या पूजनाची प्रथा होती असें आढळून येतें. जावांत आणि मलायांत गणपतीच्या पंचधातूच्या तसेंच प्रस्तराच्याही मूर्ति सांपडलेल्या आहेत.

बाली द्वीपांत देखील चारीबाजूला ज्वाळानीं रेखीत अशा सिंहासनावर अधिष्ठीत गणराजाची मूर्ति मिळालेली आहे. तिथल्या राजा—राणीच्या मृत्यूनंतर त्यांच्या प्रतिमा तयार करून त्यांना देवपद देण्यांत येई आणि त्यांच्या त्या प्रतिमा प्रतिष्ठानानंतर दक्षिणेला गणेशाची एक मूर्ति बसवण्यांत येई. जावांत कांहीं भीतिप्रद अशा ठिकाणीं गणपतीची मूर्ति स्थापलेली आढळते. अशा मूर्तिंतली एक मूर्ति हॉलंड येथील म्यूझियममध्यें ठेवलेली आहे. बर्मा येथें गणपतीची 'महापिएन' या नावानें पूजा केली जाते. फार काय अजूनही सयाम, काम्बोदिया आदि देशांत गणेशाची पूजा विघ्न हर्ता याच नात्यानें केली जाते.

चीनमध्यें तर कांहीं कांहीं ठिकाणीं बुद्धाच्या मूर्ति बरोबरच सूर्य, चंद्र, कामदेव आणि गणपतीच्याही मूर्ति आहेत. जपानांत आढळणाऱ्या गणपतीच्या मूर्तिच्या हातांत मुळा दिलेला असतो. गणपतीला मुळ्याची भाजी फार प्रिय आहे, असा तिथें समज आहे.

तुर्कस्तानांतहि शिव कार्तिकेयासहित गणपतीचें चित्र संशोधकांना सांपडलेलें आहे. असा हा आमच्या आदिदेवाचा अनेक खंडांतला विस्तार !

ऐतिहासिक सत्यांच्या खरेखोटेपणाचा कीस काढणाऱ्या संशोधकांनी गणेशाला सोडलेलें नाहीं. त्यांच्या मतें रामायणांत गणपतीचा उल्लेख नाहीं. महाभारतांत जो गणेशाचा उल्लेख आहे तो निव्वळ घुसडलेला वाटतो असेंहि संशोधक म्हणतात. वास्तविक महाभारत व्यासांनीं सांगितलें आणि गणेशांनीं तें लिहिलें, अर्थात्च स्वतःबद्दलचा उल्लेख त्यानें विनयानें टाळला असला पाहिजे हें उघड आहे. 'विद्या विनयेन शोभते' असें म्हणतात, मग विद्यादात्याजवळ तो भरपूर असला पाहिजे, असो !

याज्ञवल्क्यानें गणपतीला विघ्नेश असें म्हटलेलें आहे; परंतु गणेशपुराणांत त्याचा स्पष्टार्थ असा सांगितला आहे, कीं कुठल्याहि शुभकार्यारंभीं त्याला आमंत्रण करून त्याची प्रथम पूजा केली नाहीं तरच रागानें त्या कार्यांत तो विघ्न निर्माण करतो, आणि त्यामुळें कार्यारंभीं त्याची आठवणी केली जाऊं लागली. ख्रिस्तपूर्व काळांतील विघ्नेश गणपतीचें स्वरूप पालटून आज त्याला विघ्नहर्त्याचें रूप मिळालें आहे असेंहि अनेकांचें म्हणणें आहे.

मनूच्या नांवावर मोडणाऱ्या एका श्लोकांत गणेश हा हीन यातींचा देव असा निर्देश आहे. ऋग्वेदांतील 'गणानां गणपति' हा उल्लेख बृहस्पतीला उद्देशून आहे असेंहि संशोधक सांगतात. गणेशाचा अत्यंत प्राचीन असा उल्लेख तेराव्या शतकांत लिहिल्या गेलेल्या जयद्रथ या काश्मिरी पंडिताच्या 'हरचरित्र' या ग्रंथांत सांपडतो, त्याचा एक दांत दशमुखी रावणानें तोडला असल्याची कथा आहे, तर शिशुपाल वधांत हें काम परशुरामानें केल्याचा निर्देश आढळतो. कांहींच्या मतें तो राक्षस असावा तर कांहींनी त्याला हत्तीचें बनावट शीर घालणाऱ्या आदिवासींचा नायक बनवलेलें आहे. शेतांचा नाश करणाऱ्या उंदरावर दहशत म्हणून गजमुख देवतेची निर्मिती झाली असेंही कांहीं म्हणतात परंतु हें सर्व आधुनिक संशोधन अभिजात भाविकांना पटाणारे नाहीं. गणेशाची नित्य उपासना प्रामुख्यानें दक्षिणेंत होते. त्रावणकोर येथें गणपतीचीं अवाढव्य देवळें आहेत. महाराष्ट्रांत पाली, थेऊर, लेण्याद्रि, ओझर, रांजणगांव चिंचवड, पुळें, परळी वैजनाथ आदि स्वयंभू गणेशस्थानें प्रसिद्ध आहेत.

महाराष्ट्रांतील सर्व संतानी आणि शाहिरांनी लेखनारंभीं त्याला पहिला मानाचा मुजरा केलेला आहे. ज्ञानेश्वरांनीं 'सर्वांचाआदि' म्हणून वंदन करून "अकार चरण युगल। उकार उदर विशाल। मकार महामंडल। मस्तकाकारें ॥ हे तिन्ही एकवटले। तेथ शब्दब्रह्म कवळलें। ते मियां श्रीगुरुकृपा नमिलें। आदिबीज ॥" असें म्हणून प्रथम वंदन केलेलें आहे. श्री रामदासानीं, "तुझिये कृपेचिनि बळें। विलुठती भ्रांतीचीं पडळें।" असें स्तवन करून, "ऐसा जो परमसमर्थ। पूर्णकरी मनोरथ। सप्रतीति। भजन स्वार्थ। कलौचंडी विनायकौ ॥" अशा शब्दांनीं गौरवून नमस्कार केलेला आहे, फारकाय कविरायानीं देखील "कार्यसिद्धिकर इतर दैवतें बारावर्षें बसा। हा आज आठचौदिसां।" अशी रोकड्या प्रचीतिची ग्वाही दिलेली आहे !

अशा या सर्व महान संतानीं, शाहिरानीं कार्यारंभीं वंदिलेल्या आदिदेवाला भक्तिभावानें नमस्कार असो !

— गोपाळकृष्ण भोबे







# भारतीय लोकनृत्यें

**( राजस्थान )**

इतर कोणत्याहि प्रांतापेक्षा राजस्थान लोककलेंत मागें नाहीं. राजस्थानचीं लोकनृत्यें वैविध्यपूर्ण आणि सरस आहेत.

'घुमर' हें राजस्थानचें अति लोकप्रिय लोकनृत्य. राजस्थानी स्त्रिया होळी आणि दिवाळीच्या वेळीं हें नृत्य वारंवार करतात. 'घुमर' हें लोकनृत्य चित्रविचित्र आणि आनंदी. त्यांतील हावभाव सहजपूर्ण आणि सुंदर असतात.

पूर्वराजस्थानमध्यें 'गिंदाड' नांवाचें एक समूह नृत्य लोकप्रिय आहे. होळीला पंधरा दिवस असतांना सर्व जमातींचे लोक एकत्र येऊन हें नृत्य करतात. प्रत्येक मोहल्ल्यांत ढोलकीवाल्यासाठीं एक उंच व्यासपीठासारखा मंच तयार करतात. आणि रंगीबेरंगी पोषाख केलेले हातांत काठ्या घेतलेले लोक त्याठिकाणीं नृत्य करण्यासाठीं जमा होतात.

गणेशचतुर्थीला मिरवणुकींत राजस्थानी मुलें आणि मुली हातांत टिपऱ्या घेऊन नाचत असतात.

'खयाल' नांवाचें राजस्थानचें नृत्यनाट्य ४०० वर्षांपूर्वींचें प्राचीन आहे. हें 'खयाल' नृत्यनाट्य करणारे धंदेवाईक संच दूरदूरच्या खेड्यांतहि आपले कार्यक्रम करीत असतात.

मध्ययुगांत लोकनृत्यांना हीन समजलें जाऊं लागल्यामुळें राजस्थानची लोककला लोपली. त्यामुळें जमातीतील कुशल असे नर्तक बाहेर फुटून निघाले आणि त्यांनीं 'भवाई' नांवाची एक स्वतंत्र जमात स्थापन केली. ४०० वर्षांपूर्वीं नागोजी जाट नांवाच्या एका नामवंत लोकनृत्यकारानें त्या जमातीची स्थापना केली असें इतिहास सांगतो. गति आणि विविधता हा भवाई नृत्याचा मोठा विशेष. भवाई जमातींत लहानपणापासूनच नृत्याचे धडे दिले जातात आणि लवकरच ते धंदेवाईक कौशल्य संपादन करतात. स्त्रियांच्या भूमिका पुरुषच करतात. खेडूतांचे रोजचें जीवन हा त्यांच्या नृत्याचा विषय आणि कांहीं वेळां ढोला मारूची अमर प्रेमकहाणी चित्रित केली जाते. कांहीं प्रसंगीं यांचीं नृत्यें अश्लीलत्वाकडे झुकत असली तरी त्यांत विनोदाचा भाग मोठा असतो. पावसाळा संपला कीं भवाई नृत्यकार आठ महिन्यांच्या दौऱ्यावर निघतात. त्यांचे ठराविक यजमान (आश्रयदाते) असतात आणि त्यांच्याकडून मिळणाऱ्या बिदागीवरच त्यांचा वर्षभराचा चरितार्थ चालतो.

मारवाडची ख्याति 'कठपुतळी' या बाहुल्यांच्या नृत्याबाबत. कठपुतळीवाला या बाहुल्या नाचवतो आणि त्याची बायको ढोलकें वाजवीत कहाणी गात असते. हा खेळ रात्री दोन तास तरी चालतो. राजस्थानी कठपुतळीवाले आसामपर्यंत आपला दौरा काढतात आणि पैसे मिळवितात.

थर वाळवंटाच्या अगदीं दूरच्या भागांत सिध जाट नांवाची एक रांगडी जमात राहाते. ते गुरु गोरखनाथाचे अनुयायी आणि मोठे योगाभ्यासी असतात. मोठा विस्तव पेटवतात, ढोलकी वाजूं लागतात, लांब लांब पिपाण्यांचे सूर वातावरण भरून टाकतात आणि नृत्याला आरंभ होतो. नंतर कांहीं सिध जाट आगींत उडी टाकून तेथेंच नाचतात. हें अग्निनृत्य निदान तासभर तरी चालतें. गुरु जसनाथ यांच्या पुण्यतिथीदिवशीं साधारण मार्च एप्रिलच्या दरम्यान हें अग्निनृत्य केलें जातें.

राजस्थानच्या डोंगराळ भागांत राहाणाऱ्या भिल्लांचे समूहनाच अनेकविध असून त्यांत कांहीं युद्धनृत्यें असतात. सणासुदीच्या दिवशीं अगर विवाहसमारंभाच्या वेळीं स्त्रीपुरुष वर्तुळाकार एकत्र येऊन घुमर नृत्य करतात.

बाग्रीया जमात मुख्यत्वेंकरून झाडू तयार करते. होळीच्या दिवशीं हे लोक घरोघर बाग्रीया नृत्य करतात, मात्र त्यावेळीं बाई नाचते आणि पुरुष चांग वाजवतो.

राजस्थानची कारवेलीया नांवाची गारुड्यांची जमात मोठी चित्रविचित्र आहे. त्यांच्या बायका नृत्यगायनावरच पैसे मिळवितात. शंकारीया आणि पनीहारी हे त्यांचे लोकप्रिय नृत्यप्रकार. याशिवाय कामड नांवाची जमात एक लोकप्रिय नृत्यप्रकार करते. यांत पुरुष एकतारीवर गातो आणि स्त्री आपल्या हावभावांनीं दळणें, कांडणें, दहीं घुसळणें चपात्या करणें, चरख्यावर सूत काढणें इत्यादि क्रिया दर्शविते.

**कथा–कलि**

दिवाळी अंकाची (अ) पूर्व तयारी : लेखक




आम्हांला सतरा गोष्टी लिहायच्या आहेत.



त्या वस्तूचा स्पर्श किती गोड लागला ! जणुं मुलखाचें माधुर्य त्यांत ओतलेलें होतें. माझ्या साऱ्या वृत्ति भरभरून आल्या. मला काय बोलावें, काय करावें हेंच सूचेना. सुदैवानें मी क्षणांत ताळ्यावर आलों आणि खिशांतल्या डायरींत तिचा नांवपत्ता लिहून घेण्याचें मला सुचलें.

**प्र वा स  क था**

आज आम्हाला नुसती भटकेगिरी करायची आहे, कोणत्या भागांत जाऊं बोला—मी कियोटोच्या मियाको हॉटेलच्या कौंटरवर विचारलें.

—मग तुम्ही सिंक्योगोकु मार्केटांत जा.

—काय आहे त्या मार्केटांत असं ?

—तुम्ही जा म्हणजे समजेल. कियोटोचं तें एक आश्चर्य आहे.

वात्स्यायन नि मीं निघालों. सिंक्योगोकूच्या प्रवेशद्वारांतच ध्यानांत आलें कीं आपण एका झकपक बाजारांत शिरत आहोंत. तेथल्या दुकानांचा भपकाच तसा होता. पण थोडेंसें हिंडल्याबरोबर समजलें कीं भपका हा कांहीं या मार्केटचा विशेष नव्हे; हें मार्केट म्हणजे एक स्वतंत्र जग आहे आणि या जगावर जपान्यांच्या आगतस्वागताच्या आणि कलात्मकतेच्या छाया नाचत आहेत. यांतलीं बरींचशीं दुकानें म्हणजे छोटी छोटीं प्रदर्शनेंच होतीं. या दुकानांतली एकेक फुलदाणी म्हणजे जपानी कुंभकलेचा नमुना वाटे, आणि एकेक बाहुली म्हणजे हस्तकलेची साक्षात् प्रतिमा भासे. येथें काय नव्हतें ? कापडापासून क्यामेऱ्यापर्यंत आणि खेळण्यापासून खाद्यपदार्थांपर्यंत हवी ती वस्तु—दुकानांतील मुलींच्या हास्यानें उजळून मिळण्याची सोय येथें होती. या दुकानांतून त्या दुकानांत असें भटकायला लावण्याची एक अमूर्त जादूच त्या मार्केटांत होती, आणि असें भटकून पाय थकले तर बीअरच्या पेल्यानें ताजेतवाने होण्याची सोय करण्यास जपानी चतुराई विसरली नव्हती. तुम्हाला बीअर पसंत नसेल तर पाचिंको खेळा आणि पाचिंकोच्या जुगारांत फसवणूक होत आहेसें वाटलें तर नेमबाजीच्या जुगारांत नशिब फळफळतें कां पाहा. तुमची प्रकृति कशीहि असली तरी तिला बांधून ठेवण्याची सोय या मार्केटांत होती. पण असल्या कोणत्याच भानगडींत न पडतां त्या मार्केटांत नुसते भटकलें तरी पुरें होतें. त्या मार्केटांतला साधा फेरफटका हा एक अनुभव होता आणि मी व वात्स्यायन या अनुभवांतच मश्गुल होतों. पाय चालू लागले कीं चालायचें आणि पाय दमले कीं नजर दुकानांतल्या प्रसाधनावर फिरवीत उभें राह्यचें असा आमचा खाक्या होता—

इतक्यांत पलीकडच्या नाक्यावरील दृश्याकडे माझें लक्ष गेलें आणि नजर चकित झाली.

चकित व्हावी असेंच तें दृश्य होतें. दोन स्त्रिया. तरुण. सुंदर. त्यांतली विशेष तरुण ती आमच्याकडे धृष्ट नजरेनें पाहत आहे आणि तिच्याहून थोडीशी वडील असलेली दुसरी तिला खेंचून नेत आहे. अशा भर बाजारांत एक स्त्री दुसरीला खेंचीत आहे एवढेंच दृश्य चकित करायला पुरेसें आहे. पण त्यांतल्या एका स्त्रीची दृष्टि आमच्यावर खिळली आहे आणि दुसरी स्त्री तिला ओढून नेत आहे—कोणाचीहि वृत्ति अगदीं अंतरंगापासून ढवळून निघायला मग अवकाश





अनुक्रमणिका

किती ? पण त्याहि परिस्थितींत त्या दोन तरुण स्त्रियांकडे, विशेषतः या ओढाताणीच्या पवित्र्यांतल्या स्त्रियांकडे पाहात राहण्याइतकी माझी नजर निर्ढावलेली नव्हती. ती एकदम गोंधळली, आणि शेजारच्या दुकानांतल्या बाहुल्यांकडे वळली. वळली पण लगेच मागें फिरली आणि त्या दृश्याकडे धांवली. पण आतां तें दृश्य होतेंच कुठें ? तें केव्हांच अंतर्धान पावलें होतें. आतां ती आमच्याकडे धृष्ट नजरेनें पाहाणारी तरुणीहि नव्हती आणि तिला भरबाजारांत खेंचणारी तिची मैत्रिणहि नव्हती. त्या विघ्नसंतोषी बाईनें तिच्या त्या निरुपद्रवी समाधानांत विघ्न घातला होता !

**प्र भा क र पा ध्ये**

क्षणभर वाटलें, आपल्याला भरबाजारांत उभ्या उभ्या एकादें स्वप्न तर पडलें नाहीं ? स्वप्न या भपकेबाज बाजाराला अगदीं शोभेसे होतें, पण क्षणांत तें विरलें. डोळ्यांवर तें स्वप्न तरळत आहे आणि आंत हुरहूर, तगमग किंवा असेंच कांहींतरी होत आहे—आणि तरीहि कांहीं घडलेंच नाहीं अशा आविर्भावांत वात्स्यायनशी गप्पा मारण्याचा मी प्रयत्न करीत आहे—

इतक्यांत आमच्यासमोर त्या दोन स्त्रिया उभ्या ! आणि त्यांतली ती तरुण, सुंदर, आमच्याकडे धृष्ट दृष्टीनें पाहणारी—डाव्या हातांत मखमली मिजाशीची मनिबॅग आणि उजव्या हातांत रंगीबेरंगी ऐटबाज आवरणांत गुंडाळलेली कसलीशी वस्तु धरून आमच्याकडे–माझ्याकडे पाहात आहे. तिची दृष्टि संकोचलेली आहे. चेहरा गोंधळलेला आहे, पण त्याच्यावर एक प्रकारची अधुरी उत्सुकता आहे आणि म्हणूनच तो कमालीचा आकर्षक दिसत आहे.

हें काय चाललें आहे तरी काय ? अजून तें स्वप्नच सुरू आहे कीं काय ? पण स्वप्न कसें असेल ? ती तर अगदीं खरी दिसत आहे. तिच्या ओठावर कांहींतरी उत्सुक शब्द अडखळत आहे. माझें एकदम वात्स्यायनकडे लक्ष गेलें आणि त्यांच्या चेहऱ्यावर कसलीशी अलिप्तताच भासली. याचेंहि मला आश्चर्य वाटलें. तोंच तिच्या तोंडून शब्द फुटला—एक अर्धाच, आणि लगेच माझ्या ध्यानांत आलें कीं हिला इंग्रजी नीटसें येत नाहीं. आतां काय करायचें ? पण जें तोंडून व्यक्त होत नव्हतें तें हातांतून व्यक्त होत होतें—होतें आहेसें वाटत होतें. तिच्या हातांतली वस्तुच बोलकी बनत होती—

एकदम माझ्या डोक्यांत प्रकाश पडला—ही ती हातांतली वस्तु आपल्याला देण्याचा प्रयत्न तर करीत नसेल ? पण कां ?—अन् कां नकळे, क्षणांत वाटलें, ही आपल्याला ती भेट देत असेल. आणि मी एकदम म्हटलें—तिच्या इंग्रजीच्या ज्ञानाची पुसटशी जाणीवहि न होतां म्हटलें—Is this a present? ( आपण ही भेट देत आहांत का ? ) माझ्या तोंडून ' प्रेझेंट ' हा शब्द बाहेर पडला मात्र. तिचे डोळे लकाकले आणि ओठाशीं अडलेलें इंग्रजी फटकन् बाहेर पडलें. " Yes-Yes—Present-Kyoto doll ! " ( होय होय, भेट— आमच्या कियोटीची बाहुली ! )

तिच्या डोळ्यांतल्या मासोळीची उडी, तिच्या कलदार बोलण्याचा विलोरी आवाज आणि तिच्या हातांतल्या वस्तूची रंगीन झळाळी—या साऱ्यांचें मिश्रण माझ्या मनांत सळसळलें आणि मी पार गोंधळून गेलों. कसलें कांहीं आकलनच होईना. हा भर बाजार, त्यांत मी, कुठचा कोण, ही जपानी बाई मला पाहते, लगेच एक वस्तु विकत घेते आणि ती मला देण्यासाठीं माझ्यासमोर येऊन उभी राहाते—कशास कांहीं पत्ता ? कांहीं संगति ? कांहीं अन्वयार्थ ? एकदम मी तिच्याकडे पाहिलें. तिच्या नजरेवर नजर रोखून पाहिलें आणि मला तिच्या तरळत्या नजरेंत विलक्षण कळकळ दिसली. लगेच मी ती वस्तु घेण्यासाठीं हात पुढें केला. एकदम तिचा चेहरा हास्यानें फुलला—आनंदानें उजळला !

त्या वस्तूचा स्पर्श किती गोड लागला ! जणुं मुलखाचें माधुर्य त्यांत ओतलेलें होतें. माझ्या साऱ्या वृत्ति भरभरून आल्या. मला काय बोलावें, काय करावें हेंच सुचेना. सुदैवानें मी क्षणांत ताळ्यावर आलों आणि खिशांतल्या डायरींत तिचा नांवपत्ता लिहून घेण्याचें मला सुचलें.

\+ \+ \+

भेट आली कीं परतभेट गेलीच पाहिजे ही जपानी पद्धत मला माहित होती. सुदैवानें मजपाशीं एक सुबकशी हस्तीदंती हत्तींची जोडी होती. दुसऱ्या दिवशीं हॉटेलच्या पोऱ्याबरोबर ती तिच्याकडे पाठवून दिली. आपली ही परतभेट योग्य आहे कीं अयोग्य आहे, तिच्या भेटीच्या मानानें ती क्षुल्लक ठरेल कीं भारी ठरेल, भारी ठरली तर तिला आपल्या डोक्यावर हें भलतेंच ऋण लादलें गेलें असें नाहीं का वाटणार, वगैरे कसल्याहि गोष्टींचा विचार मी केला नाहीं. कसा करणार ? जपानी भेटीचें शास्त्र मला माहितच नव्हतें. परतभेटीनें भेट देणाऱ्या व्यक्तीला अडचणींत पडल्यासारखें वाटतां कामा नये, तिचा अपमान झाल्यासारखें वाटतां कामा नये, वगैरे मला कांहीं ठाऊक नव्हतें. आपल्याकडची सर्वोत्कृष्ट वस्तु तिला द्यायची, आणि तिच्या भेटींत ज्या उदार, आतिथ्यशील, संस्कारित अंतःकरणाचें दर्शन झालें त्याचा होईल तितका सन्मान करायचा एवढीच माझी बुद्धि होती. माझ्या जवळच्या वस्तूंत ही हत्तींची जोडी सर्वोत्कृष्ट होती, म्हणून ती मी पाठविली. अशी वस्तु आपल्यापाशीं निघाली याचाच मला आनंद झाला, आणि त्या आनंदाच्या भरांत मी ती जोडी पाठवून दिल्याचेंहि विसरून गेलों.

पण दुसऱ्या दिवशीं सकाळींच माझ्या खोलींतला टेलिफोन वाजला. फोनवर स्त्रीचा आवाज. माझ्या स्मृतीनें एकदम गिरकी खाली ! हा तिचाच आवाज. पण त्या आवाजांतून माझ्या नांवाच्या आद्याक्षरापलीकडे कसला बोध झाला नाहीं. टेलिफोनवर संभाषण करण्याइतकें आपल्या तुटपुंज्या इंग्रजीला चेहऱ्यावरच्या, नजरेंतल्या भावांची जोड दिल्याशिवाय आपल्या मनांतला आशय व्यक्त करण्याइतकें त्या भाषेचें ज्ञान तिजपाशी नव्हतें. तो फोन वाजला तसाच तुटला—फक्त तुटतांना अडखळला !

जरा वेळानें फोन पुनः वाजला. आतां हॉटेलच्या कौंटरवरचा कारकून बोलत होता—" मिस् कियो साकुराय् आपल्या भेटीबद्दल आपले आभार मानीत आहेत आणि आपण

टोकियोला परत केव्हां जाणार म्हणून विचारीत आहेत.—" मी केव्हां जाणार, कोणत्या गाडीनें जाणार वगैरे सांगितलें. मिनिटभरांत टेलिफोन पुनः वाजला. तो कारकून सांगत होता—" मिस् साकुराय् आपल्याला निरोप द्यायला स्टेशनवर येतील."

याच कारकुनाने आमच्यापाशीं सिंक्योगोकू मार्केटची शिफारस केली होती. त्याच मार्केटमध्यें साकुराय् मला भेटली—नुसती एकदांच भेटली असें नव्हे आतां ती मला पुनः भेटणार—स्टेशनवर मला निरोप द्यायला येणार! खरेंच सिंक्योगोकू मार्केट हें एक आश्चर्य आहे. कारकून म्हणाला तें अगदीं बरोबर. माझ्या आयुष्यांतला एक आश्चर्यकारक अनुभव मला याच मार्केटांत आला.

पण मी टोकियोला जाणार हें हिला कसें समजलें? आच्छा! म्हणजे मी पेन परिषदेसाठीं आलेला प्रतिनिधि एवढें तिला ठाऊक आहे, आणि पेन परिषदेच्या प्रतिनिधींची हालचाल तिला पक्की माहित आहे. साहित्यिकांबद्दल प्रेम आणि आदर यानीं भारावून गेलेल्या असंख्य जपानी मुलामुलींपैकींच ती एक आहे. परवां सिंक्योगोकूमध्यें तिनें आम्हाला पाहिलें आणि या भावनांची कदर करण्यासाठींच तिनें ती बाहुली मला भेट दिली. तिच्या मैत्रिणीला तिचा हा सारा भाबडेपणा वाटला असावा आणि म्हणून ती तिला परावृत्त करीत असावी.

कांहीं का असेना, साहित्यिकांबद्दलचा आदर व्यक्त करण्यासाठीं तिनें मला निवडलें होतें. आणि मला निरोप देण्यासाठीं ती मुद्दाम कियोटो स्टेशनवर येणार होती. मला फार फार बरें वाटलें. धन्य वाटलें. स्टेशनवर मी तिची अधीरतेनें वाट पाहूं लागलों. पण गाडीला आठदहा मिनिटें उरली तरी तिचा पत्ता नाहीं. आंत निराशा दाटली. अस्वस्थता संचरली. आतां गाडी सुटायला फक्त चारपांच मिनिटें आहेत. आतां कसली येते ती? माझी अधीर अस्वस्थ नजर फलाटाच्याटोकापर्यंत फिरून आली. आतां कसली येते? तरीपण नजर स्टेशनवर फिरत होतीच. पुरता निराश होऊन मी माझ्या जागेवर येऊन बसणार इतक्यांत ती दिसली. धांवत धांवत येत होती. धांदलीनें येत होती. तेवढ्यांतल्या तेवढ्यांत ती धांदल मला मजेदार वाटली. इतक्यांत ती आली. हंसली आणि नजर माझ्या नजरेवर रोखून तिनें आणखी एक वस्तु माझ्या पुढें धरली. मी थक्क झालों, मला कांहीं कळेनाच. ही आणखी भेट कशाला? तसें मी तिला म्हटलें. पण माझें म्हणणें तिला कळलेंच नाहीं. ती आपली आग्रह करीत आणि ती वस्तु माझ्या हातांत कोंबण्याचा प्रयत्न करीत राहिली.

अखेर मी ती घेतली—कृतज्ञ हातांत धरली आणि कृतज्ञ नजरेनें तिच्याकडे पाहात राहिलों. बोलणें शक्यच नव्हतें. कांहीं बोलावें असें वाटतहि नव्हतें. मन मात्र आदर, आपुलकी, कृतज्ञता यांनीं भरून गेलें. त्यांतच विषादाची एक छटा उमटली. ही कीयोटोची कुठली कोण—मुद्दाम मला भेट देते, मला निरोप द्यायला येते. आणि येते ती अशी कीं, क्षणांत हा संबंध संपणार! आतां पुनः कधीं ती मला भेटणार नाहीं. भेटण्याचा संभव नाहीं. तिच्या भेटींच्या रूपानें तिची स्मृति शिल्लक राहील, पण कोरडी स्मृति! अंतःकरणांत एक सूक्ष्म वेदना उठली—पण कृतज्ञतेच्या भावनेंत भिनून गेली.

इतक्यांत गाडी हलली. मी घाईघाईनें चढलों आणि तिचा निरोप घेऊं लागलों. भारतीय पद्धतीनें तिला नमस्कार केला. आणि ती—गाडीच्या बरोबर पावलें टाकीत चालू लागली—आणि वाढत्या वेगानें पावलें टाकतां टाकतां 'सायोनारा' 'सायोनारा' असें पांच वेळां म्हणाली. हळुहळू तिची मूर्ति मागें मागें









जाऊँ लागली. दिसेनाशी झाली आणि तिच्या कलदार आवाजाला कारुण्याची झार आणणारा तो 'सायोनारा' तेवढाच माझ्या कानांत घुमत राहिला.

\+ + +

योशिएला ही हकीगत मीं सांगितली— उत्साहानें सांगितली, अभिमानानें सांगितली आणि तिनें माझ्या साऱ्या उत्साहावर आणि अभिमानावर घडाभर थंड पाणी ओतलें. ती म्हणाली—

—त्यांत इतकं हुरळून जाण्यासारखं काय आहे ? भेटी देणं आणि भेटी घेणं याचं आम्हा जपानी लोकांना वेडच आहे. त्यासाठीं कसलंहि निमित्त पुरतं. आज काय कोणाचा वाढदिवस आहे, मग दे त्याला चित्राची एक फ्रेम आज काय ऑगस्टमधलं चंद्रदर्शन आहे, मग दे काव्याचं अगर चित्राचं पुस्तक बक्षिस. बाहुल्यांचा सण आला की प्रत्येक मुलीला बाहुली मिळते आणि चेरीच्या मोहराच्या दिवसांत चेरीच्या फुलांची नक्षी काढलेले रुमाल सारखे फडफडतात. आम्हीं जपानी लोक भेट देण्यासाठीं निमित्तच शोधीत असतो.

—पण—मी कांहीं तरी बोलण्याचा प्रयत्न केला.

—पणबिण कांहीं नको.

—अग पण ती मला स्टेशनवर निरोप द्यायला कां आली ?

—हात्तिच्या ! त्याचं कारण उघड आहे. तिनं तुम्हाला एवढीशी बाहुली दिली, आणि तुम्ही परतभेट काय पाठविली तर भारी किंमतीचे हस्तीदंती हत्ती. तेव्हां त्याची परतफेड करणें भागच होतं. आम्ही जपानी लोक असलं ऋण डोक्यावर घेऊन राहणारे नाहींत.

असेल, तसें असेल ! पण खरेंच, तसें असेल ? माझें अंतःकरण विषादानें भरून गेलें. आपलें कांहीं तरी हरवलें, कांहीं तरी हरपलें असें वाटलें. सारा उत्साह, सारा अभिमान गळून पडला. जड पावलानें हॉटेलांत परतलो.

पण खोलींत आलों, टेबलावरच्या त्या बाहुलीकडे पाहिलें नि म्हटलें, नाहीं. योशिए म्हणते तें इतर जपान्यांच्या बाबतींत खरें असेल, पण साकुरायूच्या बाबतींत तें बिल्कूल खरें नाहीं. असणें शक्य नाहीं. तिची भेट म्हणजे नुसता उपचार नाहीं. ती भेट अशी तशी नाहींच मुळीं. निर्मळ स्नेहाचा धागा तिच्या भोंवतीं गुंडाळलेला आहे.

आणि आज ती बाहुली मी माझ्या कपाटांत पाहतों तेव्हां त्या बाहुलीच्या मागें साकुरायूची मूर्ति—काळ्याभोर केंसांची, इवलाल्या मासोळीसारख्या डोळ्यांची, प्राजक्ताच्या फुलासारखें हंसणारी मूर्ति उमलते, आणि मग—

—स्वतःला इंग्रजी येत नसतांना सुद्धां पुतण्याकडून लिहवून घेऊन नियमित पत्रें पाठविणाऱ्या,

—ॲपेण्डिसायटिसच्या आजारांत मी दिलेल्या हत्तींच्या जोडीवर नजर खिळवून पोटांतल्या वेदना विसरूं पाहणाऱ्या,

—पत्रांतून चेरीच्या कळ्या पाठविणाऱ्या,

—वर्षदिनाची पत्रिका पाठवितांना कोमल कलादृष्टि व्यक्त करणाऱ्या,

—स्वतःचा फोटो पाठवितांनाचा संकोच शालीनतेनें आकर्षक करणाऱ्या,

—आणि जपानचें सांस्कृतिक सौंदर्य मला कळविण्याकरितां ( पुतण्याच्या साहाय्यानें कां होईना पण ) शब्दांचें सारें सामर्थ्य गोळा करणाऱ्या—

त्या राजस स्त्रीच्या स्नेहाचा सुगंध माझी स्मृति दरवळून टाकतो. • •



## अ भि सा र

अपुल्या नादात
कुठे ही चालली
धुंदीत एकली
लाल घिटुकली १

रान फुलांचेच
घोस हे कुंतली
नखऱ्या मधेंच
जाणीवगुंतली २

हिचिया लोचनी
आज रानभूल
खोल तळामधे
प्रीतीची चाहूल ३

डोंगर दरीत
रानाच्या कुशीत
अधीर होउन
चालली सुसाट ४

गुणगुणते ही
गतीचेंच गान
काट्या कुट्यांचेही
राहिले न भान ५

पानापानांतून
घुमतसे शीळ
मन झेपावते
मत्त उतावीळ ६

खट्याळ हा वारा
उगा डिवचतो
सोन सावल्यांचा
साज विस्कटतो ७

छेडित आतुर
हृदयाच्या तारा
वाट घिटुकली
जाय अभिसारा ८

—वृंदा लिमये




# प्रतारणा

भाऊसाहेब जोगळेकरांना भेटणं आवश्यक होतं म्हणून श्रीधरनं आपला कार्यक्रम बदलला. ठरल्याप्रमाणें दुपारीं एक वाजतां ते भेटले असते तर तास अर्धा तास त्यांच्याशीं एका महत्त्वाच्या विषयावर चर्चा करून त्यांचा सल्ला घेऊन लगेच तीनाची गाडी तो धरणार होता. कांहीं झालें तरी रात्रीं अकरापर्यंत त्याला मुंबईस जाऊन घरीं पोह-चणें अगत्याचें होतें. विमलला म्हणजे आपल्या पत्नीला श्रीधरनं त्याप्रमाणं येतांना वचन दिलेलं होतं.

आतां कमीतकमी एक तास तिथं रस्त्यावर उभं राहणं किंवा कुठेंतरी भटकून वेळ काढणं त्याला भाग होतं. सदाशिव हौदाच्या एका कडेला फुटपाथवर सेकंड हँड पुस्तकाचें एक लहानसें बैठे दुकान दिसलें. वेळ घालविण्या-साठीं म्हणून त्या दुकानांतून एक जुन्यांतले जुनें पण खूप जाडजूड असें पुस्तक श्रीधरनें फक्त सहा आण्याला विकत घेतलें. त्या पुस्तकाचें नांव होतें—"रोमॅन्स ऑफ म्युझियम."

श्रीधर कोपऱ्यावरच्या हॉटेलांत गेला, एक स्पेशल मिसळीची त्यानं ऑर्डर दिली आणि तो तें जाड पुस्तक चाळीत बसला. लंडनच्या एका म्यूझियमचा तो भरगच्च कॅटलॉग होता. खूपशी चित्रंहि होतीं त्यांत. रोमॅन्स ऑफ म्युझियम—काय नांव आणि काय मजकूर ! डम्बीस टेकाचे ! पण सहा आण्याला महाग नाहीं हा सौदा ! डॅम चीप ! विमलला तर चक्क तीन आण्यालाच हा ग्रंथ मिळाला म्हणून आपण सांगणार ! अरे पण अशा किरकोळ फाल्तू बाबतींत स्वतःच्या पत्नीला बनवायचं काय कारण ! काय कारण ? देन यू डोन्ट नो माय विमल ! ओह् शी इज ऑफुल—बट ब्युटिफुल ! विमलसारखी सुंदर आणि तित-कीच प्रेमळ बायको मिळणं इज नो जोक ! यालाच आम्ही भाग्यरेषा म्हणतो—सी धिस माऊंट ऑफ व्हीनस—हा शुक्राचा माऊंट पहा आमचा–! श्रीधरनं हाताचा तळवा उघडला आणि शुक्राच्या उंचवट्यावर त्याची नजर स्थिर झाली. हॉटेलच्या पोऱ्यानं मिस-ळीची बशी त्याच्या पुढ्यांत टेबलावर हापटली नसती तर त्या शुक्राच्या माउंटवरचीं अनेक रोमांचकारक दृश्यें पहात तो तिथंच बसून राहिला असता.

आणि मिसळीचा एक चमचा तोंडांत टाकतांना त्यानं डाव्या हातानं तें पुस्तक भर्रकन चाळलं आणि त्याला कुतुहलाचा धक्का बसला. त्या पुस्तकांतून एक जुनं कोरं पाकीट खालीं पडलं. कुणी तरी चुकून त्या पुस्तकांत तें पाकीट ठेवलेलें असावें आणि अनवधानानें तें पुस्तक तसेंच रद्दीच्या दुकानांत आलें असावें, असा त्यानें तर्क केला. तें पाकीट उघडून त्यांतलें पत्र वाचण्याचा मोह श्रीधरनं जाणून बुजूनच आवरला.

भाऊसाहेबांची भेट झाली, आणि श्रीधरनं दुपारची तीन दहाची गाडी गाठली. याचा अर्थ रात्रीं आठाच्या आंत श्रीधर घरीं पोहचणार होता आणि दिलेला शब्द पाळल्या बद्दल विमल श्रीधरवरून मिठमिरची ओवाळ-णार होती ! आदर्श पती असावा तो असा ! खरं का नाहीं विमलाबाई ! विमलचे दोन्ही खांदे धरून तिला जवळ ओढीत श्रीधर तिचा खोल आणि घट्ट मुका घेणार तोंच 'तिकीट प्लीज' असें रुक्ष शब्द श्रीधरच्या कानावर आलें आणि पुन्हा शुक्राच्या उंचवट्यानं श्रीधरला दगा दिला !

रात्रीं झोपतांना श्रीधरनें दिलेल्या त्या जुनाट निळ्या पाकीटांतलं तें विलक्षण पत्र विमल पुनः पुन्हा वाचीत होती. श्रीधरनं तिला उगीचच डिवचलं, तुझ्या सारखंच हें अक्षर आहे, नाहीं ? विमलनं तशाच थंडपणानं उत्तर दिलं, हो, हें माझंच अक्षर आहे ! त्यासरशी श्रीधर ताटकन् अंथरुणांत उठून बसला. हें प्रेमपत्र आहे आणि खालीं 'लीला' अशी सही आहे, मग याचा काय अर्थ श्रीधरची कानशिलं ताडताड उडत होती. जराशानं विमलनं ती रहस्यपूर्ण कथा सांगा-यला सुरवात केली. "पुण्याच्या एस. पी. कॉलेजांत असतांना ही लीला माझी वर्गमैत्रीण होती. तिचं एका तरुणावर प्रेम बसलं होतं. पण त्या तरुणाला मात्र त्याची अजीबात जाणीव नव्हती. म्हणून तें प्रेम एका पत्रांतून व्यक्त करणं तिला भाग होतं. पण प्रेमपत्र कसं लिहावं हें लीलाला माहीत नव्हतं त्यासाठीं तिच्या वतीनं मीच तें पत्र लिहिलं. पण नंतर असं ठरलं की पत्रांतून विचारण्यापेक्षां समक्ष जाऊन त्या तरुणाला भेटणं, हें जास्त चांगलं म्हणून मी तिची वकिली पत्करून त्या तरुणाकडे गेले. "पुढं तीन चारदां आमच्या भेटीगाठीहिं झाल्या. पण त्या निष्ठुर तरुणानं..."

"काय केलं ? सांग विमल, काय म्हणाला तो तरुण ?"

तो तरुण म्हणाला, "मी लग्न करायला तयार आहे."

"गुड, म्हणजे झालं मग त्याचं लग्न तिच्याशीं ?"

"त्याचं लग्न झालं. पण तिच्याशीं नाहीं."

"मग ? कुणाशीं ?"

"माझ्याशीं !"

"म्हणजे ? ही आपल्या वर्गातली लीला देशपांडे म्हणतेस की काय ! हरे राम ! ती काळी गिड्डी जाडी ?—दॅट ब्लॅक फुट बॉल यू मीन ? कसल्या अग्निदिव्यांतून तूं मला वाचवलंस विमा !"

"पण मी प्रतारणा केली तिची !"

"खरं आहे. यू आर राइट. त्या प्रतारणे-बद्दल मी तुला आज शिक्षा करणार आहे. जिवलग मैत्रिणीचा द्रोह करणाऱ्या स्त्रिये, अशी जवळ ये आज मी तुला कठोर शिक्षा करणार आहे !"

पण श्रीधरनं ती कठोर शिक्षा करायच्या आंतच विमलनं बाजूचा दिवा मालवून टाकला.

रॉय किणीकर

**लेखकांस**

अशा **एकपानी चटकदार कथा** अवश्य पाठवाव्यात. मजकूर मात्र एक पानापेक्षां जास्त नसावा. त्या कथानां खुसखुशीत चटकदारपणा व्यतिरिक्त इतर कसलेंहि बंधन नाहीं. 'दीपावली' अशा चांगल्या कथांचा आनंदानें आदर करील.



अनुक्रमणिका






आणि हा आनंदही अनादि होता. जुने पाणी जुन्या माणसांना जुन्या आनंदाचा परिचय देत पुन्हां एकदां न्हाऊं घालीत होतें. त्यांचीं शरीरें पुलकीत करीत जीवनोत्साह देत होतें. आणि म्हणूनच उच्च कंठरवानें माणसें म्हणत होतीं……



पाऊस आला

# पाऊस आला

पु. भा. भावे

पाऊस आला—पाऊस आला ! घोंघावणाऱ्या वाऱ्याचे घोडदळ पिटाळीत पाऊस आला ! तापलेल्या धरणीवर मेघांच्या हजारों धारा शिंपडीत पाऊस आला !

मरगळलेल्या झाडांझुडुपांवर हिरवा हात फिरवीत पाऊस आला. घामेजलेल्या माणसांना नवी टवटवी देत पाऊस आला. कोरडी उन्हें ओली करीत पाऊस आला. मातीला सुगंध देत पाऊस आला.

—हा वारा येत्या पावसाची द्वाही फिरवीत आहे. उन्हानें पेंगलेल्या झाडांना गदगदा हालवून तो जागे करीत आहे. सुस्तपणें भुईवर पडलेला पाचोळा आभाळांत उडवीत आहे. मेघांच्या स्वागतासाठीं धुळीचे लोट वर उधळीत आहे. उन्हाळ्यांत निपचीत पडलेला वारा पावसाळ्याच्या प्रारंभीं नव्या जोमानें सळसळत सुटला आहे. तो फुलें उडवीत आहे व पानें उडवीत आहे. तो वस्त्रें उडवीत आहे व केसांच्या बटा उडवीत आहे. मेघांच्या भरलेल्या धारांना पुन्हां पुन्हां तोंड लावणारा वारा उन्मत्त बनत आहे. त्या ओल्या सुरया मोठ्या अवखळ आनंदाने तो खांद्यावरून वाहून नेत आहे व साऱ्या आभाळभर मांडून ठेवीत आहे. " पाऊस आला–पाऊस आला. " वस्तुमात्राशी झोंबी घेत घोगऱ्या स्वरांत वारा सांगत आहे " पाऊस आला–पाऊस आला. "

पाऊस येण्यापूर्वींच पावसाच्या छाया धरणीवर पडल्या. ढगांच्या ओल्या छत्र्या आभाळभर उघडल्या गेल्या. पाऊस येण्यापूर्वींच वाऱ्यावरून पावसाची थंड चाहूल आली. ते पहा आकाशांत काळे मेघ जमूं लागले. ते मेघ लाटांनी उसळणाऱ्या सागरासारखे दिसत आहेत. नव्हे सूर्याच्या तप्त सुवर्णरथांत बसून आकाशस्थ झालेला तो सागरच आहे. सूर्यकिरणानीं आत्मसात केलेली जलवंती आता मेघपुष्पांच्या रुपानें आकाशांत फुलली आहे. पाण्याची तीं प्रचंड फुलें आतां लवकरच पाकळ्यानीं व परागांनीं गळूं लागतील. जलपुष्पांचा वर्षाव सुरू होईल. त्या वर्षावाची सिद्धता झाली आहे. आकाशांत मेघ जमून आले आहेत. हे मेघ राक्षसकाय शिलाखंडासारखे दिसत आहेत. हे मेघ हत्तीच्या कळपासारखे दिसत आहेत. आणि त्या मेघांतून विद्युल्लता लकाकत आहे. ही विद्युल्लता तेजलक्ष्मी आहे. ही विद्युल्लता धनलक्ष्मी आहे. ही विद्युल्लता जललक्ष्मी आहे. जलपाषाणांच्या सिंहासनावर प्रकट होणारी ही लक्ष्मी जलगजानीं परिवेष्टित आहे. जलपुष्पानीं सुशोभित आहे. संतुष्ट झालेली ही लक्ष्मी असंख्यात जलधारांचे वरदान धरिणीला देत आहे. पाऊस येत आहे—पाऊस येत आहे. जडाला चैतन्य देत पाऊस येत आहे.

पाऊस येत आहे व जें स्थिर होते तें अस्थिर होत आहे. जें कुंठित होते तें गतिमान् होत आहे. जें मृतवत् होतें तें जीवनानें स्फुरत आहे. हीं तृणबीजें ग्रीष्मऋतूंत भुईवर तशींच होरपळत पडलीं होतीं. नव्हते कसलें रूप, नव्हते कसले अस्तित्व. त्या बीजसंपत्तीतूनच आतां हिरवे स्वप्न डोकावूं लागेल. जललक्ष्मीचा स्पर्श होतांच बींजें पल्लवीत होतील. शुष्कत्तेतून सौंदर्य आकारास येईल. निर्मितीच्या प्रेरणा मुसमुसून उठतील. जीवेच्छा जागी होईल. जीवन जागें होईल. जीवन जागें होईल, व वाढीस लागेल.

ह्या नद्या, हे निर्झर आणि हे नाले आजवर शुष्क होते. त्यांची गति खंडित् झालीं होतीं. त्यांचे जीवन आटून गेलें होतें. त्यांची गती कुंठित झाली होती. दरिद्री मळ तेवढा त्यांच्या तळाशीं सांचून राहिला होता, व उघडा पडत होता. देण्यासारखें त्यांचेपाशीं आतां फारसें कांहीं उरलें नव्हतें. जे होतें तें आजवर त्यांनी सागरास दिले, वृक्षलतांना दिलें. प्राणिमात्रांना दिलें आणि परस्परांना दिलें. जीवन देतादेतांच त्यांचें जीवन आटून गेलें. त्यांचें जीवन आटलें आणि दातृत्वशक्तिहि आटत आली, ग्रीष्म त्यांच्या सत्वपरिक्षेला बसला. लोकमातांचीं अंगें उघडीं पडली त्यांची शरीरें तापून गेली. त्यांच्या पारदर्शक अंतःकरणांत खंत भरून राहिली. कृश होणाऱ्या शरीरांनी त्या आकाशाकडे पहात तपश्चर्या करीत राहिल्या. तापलेला सूर्य अद्याप त्यांचे जीवनसत्व शोषून घेतच होता. पण तो त्यांचे जे घेत होता ते शतधारानीं देण्यासाठींच घेत होता. सूर्य सहस्रकरांनीं आभाळांत पावसाचे बीज पेरीत होता आणि तेच बीज आतां उगवणार होतें. पाऊस येणार होता व पाऊस आला होता !

आणि मग कुंठित झालेले जलोघ खळाळून वाहणार होते. आपल्या ओल्या हातांनीं पाऊस सारा मळ टिपून घेणार होता. सारे स्वच्छतेनें लकाकणार होते. घराघरावरून पावसाचे पाणी ओघळणार

होते. पानें आणि फांद्या पावसाच्या पाण्यानें ठिबकणार होत्या. पक्षी ओलें आंग फुगविणार आणि झटकणार होते. प्रतिवर्षी त्याच आनंददायक नवेपणानें घडणाऱ्या पावसाचें नवल पाहून टाळ्या पिटीत मुलें जयघोष करणार होतीं. पाऊस आला–पाऊस आला.

हा नवा पाऊस होता हें नवे पाणी होते आणि ही मुलेंहि नवीच होतीं. नवा पाऊस ! नवी मुलें ! नव्हे नव्हे हा जुनाच पाऊस होता ! हे जुनेच पाणी होतें ! हा जुनाच सूर्य होता ! हें जुनेच आकाश होतें ! ही जुनीच पृथ्वी होती ! पृथ्वीवरील तेच जुनें पाणी सूर्याच्या किमयेनें आकाशांत गेलें व नवे बनून पुन्हां खालीं आलें ! हे तेच जुने पाणी होतें. पृथ्वी इतकें जुनें ! सूर्याइतके जुने ! चंद्रगुप्ता इतके जुनें ! शिवाजी इतके जुनें ! आदिमानवाइतके जुनें ! ह्याच—अगदीं ह्याच जलधारांचें सिंचन शिवाजीवर झाले होतें ! शंकराचार्यांवर झालें होतें ! कालिदासावर झालें होतें ! पाणिनीवर झालें होतें ! त्यांच्या स्पर्शानें पुनित झालेलें हे तेच जुने पाणी होतें. आणि हें आतां नवेपणानें नव्या मुलांवर बरसत होते. पण हीं मुलेंहि नवी नव्हतीं ! ह्या मुलांचें रक्त नवें नव्हतें, अस्ति नव्या नव्हत्या ! नव्याचे नांव घेऊन ते जुनेच रक्त पुन्हां एकदां प्रकट झाले होते. कालतटांतून अखंडपणें ते येथवर वहात आले होते ! हें तेच रक्त होते. हीं माणसेंहि तीच होतीं. शिवाजीच्या रक्ताचीं, शंकराचार्यांच्या रक्ताचीं, कालिदासाच्या रक्ताचीं ! हीं जुनीच माणसें ह्या जुन्याच पृथ्वीवर नव्या नांवाने अवतरलीं होतीं. आणि हा जुनाच पाऊस पुन्हां नव्यानें त्यांच्या शरीरांवर कोसळत होता. हीं शरीरेंहि तीच होतीं. हें पाणीहि तेंच होतें. आणि हा आनंदहि अनादि होता. जुने पाणी जुन्या माणसांना जुन्या आनंदाचा परिचय देत पुन्हां एकदां न्हाऊं घालीत होते. त्यांची शरीरें पुलकीत करीत होते. त्यांना जीवनोत्साह देत होते. आणि म्हणून आपल्या जुन्या मित्राचे नव्याने स्वागत करीत माणसें कंठरवानें कल्लोळ करीत होतीं, " पाऊस आला–पाऊस आला. "














अनुक्रमणिका



# हरिहर पुत्र

— पु. रा. बेहेरे

हरिहर पुत्र ही भारतीय संस्कृतीनें निर्माण केलेली वैशिष्ट्यपूर्ण देवता आहे. देवता या आपल्या संस्कृतीचीं प्रतीकेंच आहेत. आपल्या संस्कृतींतून त्या निर्माण झाल्या आणि त्यांनी संस्कृतीला वळणहि लावलें. हरिहरपुत्र ही देवता वैशिष्ट्यपूर्ण म्हणण्याचें कारण असें कीं, भारतांत जेथें तिची आवश्यक होती तेथेंच ती निर्माण झाली आणि वाढली. ही दक्षिण भारतांतील देवता आहे. उत्तर भारतांत आणि महाराष्ट्रांतसुद्धां ती आढळत नाहीं. कारण या भागांत तिची सांस्कृतिक गरजच नव्हती. हरि आणि हर यांच्यामध्यें भेद तर प्रथम सगळ्याच भारतांत मानला गेला असेल. पण ‘ शिवश्चहृदयं विष्णोर्विष्णुश्च हृदयं शिवः ’ ही शिव-विष्णु ऐक्याची कल्पना सहिष्णुतेमुळें इतर भारतांत लवकर दृढ झाली. शैववैष्णवांचे तीव्र झगडे झाले ते दक्षिण भारतांत. आणि त्यामुळेंच तेथें हरिहर-पुत्र निर्माण झाला.

दक्षिण भारतांतच हरिहर आहे. त्या नांवाची देवता आहे आणि गांवसुद्धां आहे. शिव श्रेष्ठ कीं विष्णु श्रेष्ठ या भक्तांच्या वादंगाला उत्तर देण्यासाठीं ही हरिहर मूर्ति प्रगट झाली. तिचें वामांग विष्णु-स्वरूप आणि दक्षिणांग शिवस्वरूप आहे. शैव वैष्णवांच्या त्याच वादाला उत्तर देण्यासाठीं हरिहरपुत्र जन्माला आला. पण त्याचा जन्म अधिक कल्पनारम्य आणि कलापूर्ण आहे. या पुत्र जन्माच्या वेळीं विष्णूचें स्थान वामांगींच आहे. शिव हा पति आहे; विष्णु त्याची पत्नी. शिवलिंगाची वेदी ही विष्णु-स्वरूपच मानतात. पण या पुत्र जन्माच्या वेळीं विष्णूला दिलेलें स्त्रीत्व असें प्रतीकात्मक नाहीं. तें खरेंच आहे. विष्णु म्हणजे मोहिनी.

समुद्र मंथनांतून अमृत निर्माण झालें त्यावेळीं विष्णूनें मोहिनीचें रूप घेतलें. दैत्यांना अमृत मिळूं नये म्हणून त्रिभुवनाला मोह पाडणारें तें मोहिनीचें रूप होतें. मोहिनीनें त्यांना भुलवून फसवलें आणि देवांना अमृतपान घड-विलें. त्यावेळीं अमृतपान करणाऱ्या राहूचा शिरच्छेद घडला एवढेंच आश्चर्य आपल्याला ज्ञात आहे. उत्तर भारतीय पुराणांत मोहिनीचा अवतार इथेंच संपला. क्वचित् मोहिनीच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन शंकर तिच्यामागें लागल्याची कथा सांपडते. पण त्या कथेंतहि मोहिनी शंकराच्या हातीं लागत नाहीं; ती गुप्त होते. पण या कथेंत गुप्त होणारी मोहिनी दक्षिण भारतांतील पुराणांत प्रगटते ती शंकराशीं विवाह केलेली शिवपत्नी म्हणून. मोहिनीशीं शंकर सुखाचा संसार करतो. आणि त्या संसारसुखाला पुत्र फळ लाभतें तोच ‘ हरिहर-पुत्र. ’

हरिहरपुत्राला ऐनार, महा-शास्ता अशींहि नांवें आहेत. त्याचीं मंदिरें खेडोपाडीं पसर-लेलीं आहेत. हरिहर ऐक्याचा संदेश त्याला अगदीं खेड्यापर्यंत न्यायचा होता. मलबार, तिन्नेवेली, तंजावर या भागांत त्याला प्रमुख देवतेचें स्थान आहे. दक्षिण भारतांतील इतर भागांत त्याचें स्थान ग्रामदेवतेचें आहे. ती तेथें संरक्षक देवता आहे. आपलें अवतार कार्य पुरें झाल्यानंतर हें दुय्यम स्थान पत्करूनहि हरिहर-पुत्र खेड्यापाड्यांत लोकांचा सहवास पत्करून राहिला; त्यांचा संरक्षक झाला. ग्रामदेवता म्हणून त्याला भूतपिशाच्चांचा नायक होणें भागच होतें. हें सगळें त्यानें सुखानें पत्करलें.

दक्षिण भारतांत जन्म पावलेला हरिहर-पुत्र कृष्णवर्णाचा असला तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तो कृष्णवर्ण आहे, त्याचे केंस

दिवाळी अंकाची (अ) पूर्व तयारी : नव संपादक



आम्ही अंक काढूं शकतो.

कुरळे आहेत, तो मुकुट धारण करतो आणि सुवर्णपत्राचीं कुंडलेंहि कानांत घालतो. त्याला हात दोनच आहेत. आणि त्या हातांत तो धनुष्यबाण धारण करतो. त्याचीं मंदिरें आहेत. पण अनेक ठिकाणीं त्याला वटवृक्षाखालींच बसावें लागतें. कित्येक वेळां तो हत्तीवर आरूढ होतो. त्यावेळीं धनुष्यबाणाऐवजीं तो अंकुश हातांत घेतो. त्याच्या मंदिरापुढें, त्याचे भक्त लाकडाचे किंवा शाडूचे हत्ती, घोडे करून वहातात. गांवाच्या संरक्षणासाठीं हरिहरपुत्राला रात्रौ गांवांत गस्त घालीत फिरावें लागतें. त्यावेळीं वाहन म्हणून त्याला हत्ती, घोडे हवेतच.

दक्षिणेंतील शैव-वैष्णवांचे वाद मिटवून कृतार्थ झालेला हरिहरपुत्र ग्रामीण जीवनांत रमला आहे. त्यानें भूत-पिशाच्चांचा फौजफांटा बाळगला आहे. त्यानें मदुराईवीरन्, पवाडइरायन् असे दोन सेनापती नेमले आहेत. इतकेंच नव्हे तर त्यानें पुर्नई आणि पुडगलई या दोन स्त्रियांशीं विवाहसुद्धां केला आहे. त्याचा संसार सुखानें चालला आहे. हा कृतार्थ आणि तृप्त हरिहर पुत्र भारतीय संस्कृतीचें वैशिष्ट्यपूर्ण प्रतीक आहे.

• • •

## बातम्यांची रंगभूमि

**खरा तो प्रेमा—**

ऑल इंडिया टी बोर्डानें मथुरा येथें केलेल्या संशोधनात्मक पाहाणींत असें आढळलें कीं चहाबाज आणि वर्तमानपत्रांचे वाचक यांच्यत जवळचें नाते आहे.

**हा नाद सोड सोड—**

आपल्या प्रेयसीला प्रेमपत्र पाठविण्याच्या आरोपावरून कराचीमध्यें एका तरुणाला लष्करी कायद्याखालीं अटक करण्यांत आली.

**लोळत कच मुखमधुवरी—**

एका नव्या चित्रपटातील भूमिकेकरितां आपला मोहक केशसंभार कापावा लागला म्हणून ख्यातनाम इटालीयन नटी सिल्व्हना मॅंगानो ही ढळढळां रडली म्हणे !

**म्हातारा इतुका न—**

रंगून मधील यू सान थी नामक ७३ वर्षे वयाच्या एका धर्मोपदेशकानें आपली संन्यस्त वृत्ती सोडून ६५ वर्षे वयाच्या कुमारिकेशीं लग्न केलें.

---

**दीपावलीच्या**

### वर्गणीदारांस विनंति

ज्यांना दिवाळी अंक. र. पो. नें हवा असेल त्यांनीं ५० न. पैसे पाठवून द्यावेत.

---

### लेखकांस सूचना

**दीपावली**साठीं अनाहूत साहित्य पाठवितांना लेखकांनीं पुरेसें पोस्टेज सोबत पाठवावें. सोबत पोस्टेज नसलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जाणार नाहीं.

---

## आमची पारितोषिकांची योजना

उत्तम साहित्याचा दर महिन्यास कसा पुरवठा होईल आणि त्यांतील उत्कृष्ट असें साहित्य आपण वाचकांना कसें सादर करूं शकूं याची काळजी आज प्रत्येक मासिकाच्या संपादकाला लागलेली असते. **दीपावलीचे** संपादकहि याला अपवाद नाहींत. जुन्या जाणत्यांच्याबरोबर नव्या नवथर लेखकांवर **दीपावलीचें** बारीक लक्ष आहे. अशा लेखकांकडून कसें लिहवून घ्यावें, काय लिहवून घ्यावें याची आम्ही सदैव योजना आंखीत असतों व त्यानुसार सारखे प्रयत्न चालू असतात. पण इतकं करूनहि नवनवे लेखक पुढें येत नाहींत. परिश्रम करून लिहिणाऱ्या लेखकांचाहि दुष्काळ आढळतो. अशा स्थितींत लेखनकलेंतील नवेनवे प्रयोग वाचकांना कितपत आवडतील, नव्यानव्या लेखकांकडे वाचक कितपत सहानुभूतीनें पाहातील याचीहि काळजी वाटते. यामुळें कांहींतरी नवीन पण उत्कृष्ट देणाऱ्या लेखकांकडे वाचकांनीं लक्ष पुरवावें आणि अशा लेखकांनीं हिरिरीनें लिहावें यासाठीं दीपावलीनें एक योजना आंखली आहे. ती योजना अशी कीं, **वर्षाच्या शेवटीं दीपावलीच्या वाचकांतून कथा, काव्य, निबंध इत्यादि साहित्यांतील सर्वोत्कृष्ट साहित्याच्या निवडीबाबत वाचकांचे मत मागवायचें.** ज्या वाचकांचा निर्णय अचूक ठरेल त्यांना आणि लेखकांना, दोघांनाहि आम्हीं पारितोषिकें देणार आहोंत.

मात्र यासाठीं वाचकांनीं दीपावलीचा प्रत्येक अंक जपून ठेवावा. याशिवाय वर्षाचे बारा अंक जपून ठेवणाऱ्या वाचकांनाहि अल्पदरि भेट दीपावली देणार आहे.

यासाठीं दीपावली नियमीत वाचा.



# इसाक

—आयुष्यांतून उठलेला हा इसाक!—कारण आयुष्य म्हणजे जुगार अशी त्याची व्याख्या होती. अन् हा जुगार तो मोठ्या जिद्दीनें खेळला. सारं आयुष्य त्यानं पणाला लावलं—आणि ऐन उमेदींत तो सारं गमावून बसला—

—पद्माकर गोवईकर

आज हें सगळें गाढवपणाचें वाटतें. हास्यास्पद वाटतें. आतां माझ्या आयुष्याला इतकी वळणं मिळालींत, इतकं परिवर्तन घडून आलंय कीं, वाटतं झालं तें खरंच झालं कां? या रुख आयुष्यांत अनुभवलेल्या बऱ्यावाईट गंमती खरंच घडल्या कीं, तें एक रात्र पाहिलेलें स्वप्न होतं? कांहीं कां असेना. झालं गेलं इतिहास जमा झालं असलं तरी तें गंगेला मिळालेलं नाहीं. इतक्या रात्रीं आणि इतके दिवस गेले असले तरी तें स्वप्न पुसूं शकलं नाहीं. तें सारंच खरं नाहीं हें मला कळत असूनहि माझं मन तिकडें धांव घेतं. अगदीं खारीच्या गतीनं धांवत. त्या गतदिवसांत मी मनसोक्त डुंबतों. माझ्या बालमनाला आकार आणण्यासाठीं ज्यांनीं हाताला घट्टे पाडून घेतले त्या साऱ्यांचे चेहरे माझ्या मनापुढं उभे राहातात. आणि गलबललेल्या मनानं मी त्या उध्वस्त झालेल्या जगाकडे पुन्हां नव्यानं बघूं लागतों. पुन्हां त्यांत जीव येतो. पाहतां पाहतां डोक्याला रंगीत कापडाची टोपी घातलेला, हाताचीं बोटें वांकडीं झालेली, डावा पाय खुरडत अनामिक भारानं वांकून चाललेला इसाक डोळ्यांपुढं येतो!

इसाक आतां आयुष्यांतून उठलाय! आयुष्य–जुगारांत तो खूप खेळला. मोठ्या जिद्दीनं खेळला. सारं आयुष्य त्यानं पणाला लावलं. त्याची त्याला किंमत द्यावी लागली. आणि अगदीं ऐन उमेदींत तो सारं गमावून बसलाय. राहिलेली चढण तो आतां कशी चढणार आहे देव जाणें!

आमच्या घराच्या वरल्या बाजूला रस्त्यालगत मुसलमानांचीं दोन घरें आहेत. उभ्या आळींत मुसलमानांची वस्ती काय ती तेवढीच. सारवलेल्या मातीच्या भिंती असलेलीं तीं दोन कौलारूं घरं मोठीं टुमदार आहेत. पण कुणा सटवीच्या कारकीर्दींत त्या दोन घरांमधून विस्तू गेलाय् तो कांहीं अजून विझला नाहीं. पुन्हां पुन्हां त्याच्या-वरची राख उडवली जाते अन् ते इंगळ फुलवले जातात. आया-बहिणींच्या उद्धाराशिवाय त्यांच्यांत संवाद होत नाहींत. कांहीं तरी कारणांवरून भांडण निघतें. तास तास तोंडं चालू राहातात. अश्लील शब्दांची खैरात उडते आणि तंटा विकोपास जाऊन ते वर्दळीवर येतात. मारामाऱ्या होतात. 'जातीनं' रक्तपतन होतें. सारी आळी दणाणून जाते. मग दोघंचौघं जाऊन सोडवतात. काय झालं अल्ला जाने? सारं गपगार होतं. पुन्हां रोजचे व्यवहार चालू. आपल्या

जातवाल्यांच्या दिशेला तोंडं करून उभीं असलेलीं तीं घरं त्यामुळें कुतुहलाचा विषय होऊन बसलीं आहेत.

त्यातलं अलिकडचं घर इसाकचं. निरगुंडीच्या सावलींत विसांवलेल्या त्या मातीच्या घरट्यांत दहाबारा जीव आहेत. दिवसभर कामाच्या रगाड्याखालीं मरून रात्रीं ते जेव्हां गाणीं म्हणत, गोष्टी करीत अंधाऱ्या आंगणांत मनाला विरंगुळा देतात तेव्हां त्यांच्या आनंदी वृत्तीचं मला मोठं नवल वाटतं.

त्या घराचा वडिलार्जित धंदा पटवेगारीचा. पुरणी केलेल्या किंवा जडित काम असलेल्या नगास पट्टी, गोफ, रंगीत गोंडे लावून सजवायचं. या धंद्याला खेड्याचं गिऱ्हाईक फार. पुतळ्या न् वज्रटिका पटविण्यासाठीं ‘ हा ’ ढीग लागत असे त्यांच्याकडें. पण तो काळ गेला. ती सुगी संपली. आतां माणसाच्या पोटाला मिळेनासं झालंय् अन् वज्रटिका न् पुतळ्या कोण करीत बसलाय् ? पोट मारून दागिनें काय मढ्यावर घालायचे ? दागिने पटविण्याचा त्यांचा धंदा हळुहळु बसत चाललाय्. महिन्याभरांत क्वचित् एखादं काम येतं तसलं आतां. एरवीं रंगीबेरंगी रेशमाचे गोंडे तयार करून ते विकणें हाच त्यांचा पोटाचा धंदा होऊन राहिलाय. मग त्याच्या जोडीला कुठं रेशमी गोफ, चंद्या, नाड्या आणि अनंत चतुर्दशीच्या दिवशीं नानातऱ्हेचे अनंत करून विकायचे.

मात्र एकदिलानं साऱ्यांनीं त्या धंद्यांत जीव ओतलाय. वडिलांच्यापासून ते धाकट्या आठ वर्षांच्या दाऊदखानापर्यंन्त प्रत्येकजण कामाला जुंपलेला असतो. कुणी गोंडे करतं, कुणी रविवारच्या बाजारावर ते विकायला जातं तर कुणी घरकाम बघतं. सारखं चालू असतं. आणि त्यांतून वेळ होईल तर मुलांनीं शाळा करायची. संसाराच्या दरिद्रि गाड्याला कुणी स्वतःला जुंपून घेतलं होतं तर कुणी त्याला आपल्या रक्ताचं वंगण देत होतं. गाडा चढण चढत होता.

तीं सारीं भावंडं मिळून आठजणं. पांच मुलीं अन् तीन मुलं. त्यांतला इसाकचा नंबर तिसरा. त्याच्या पाठीवर इतर पांचजणं. इसाकची आई दिसायला फार सुरेख. कोंकणस्थासारखी गोरीपान. कपाळाला कुंकू रेखलं तर कुणाची माय व्याली आहे तिला मुसलमान म्हणायला ! सरळ नासिका असलेली ती बाई इतकीं मुलं होऊनहि कशी मुलीसारखी दिसायची. इसाक मात्र वडिलांच्या छापावर गेला आहे. बुटका, काळा आणि आडव्या आंगाचा ! तो विनोदांत नेहमीं म्हणत असे,–‘ मी आमच्या वडिलांवर गेलोय आणि आमचा मुस्सा आईवर गेलाय...’

इसाकची आणि माझी ओळख कशी, कुठें झाली मला कांहीं आठवत नाहीं. पण आमची ओळख वाढली ती एका प्रसंगानं. पंधरा-सोळा वर्षांपूर्वींचा जो प्रसंग मला अजून आठवतोंय—

बेचाळीसच्या ऐन धामधुमींतले ते दिवस होते. ‘ चले जाव ’च्या वेदमंत्रानें सारीं तरुण मनं बेहोश झालीं होतीं. मला त्यावेळीं कांहीं कळत नव्हतं. पांच–सहा वर्षांच्या छबकड्याला लोक ‘ चले जाव ’ कुणाला व कां म्हणताहेत कसं कळणार ?

त्या दिवशीं शाळेंत गेलों होतो मी. मराठी पहिलींत असेन मी त्यावेळीं. दुपारची वेळ होती. त्यांतून उन्हाळ्याचे दिवस. ग्रीष्मानं साऱ्या धरणीला झपाटून टाकलं होतं. उन्हाच्या आगीनें सारीकडे कसं गपगार वाटत होतं. शाळा चालू होऊन फार तर घंटा दीडघंटा झाला असंल. कुठल्यातरी वर्गांत मास्तर जीव तोडून शिकवत होते. आणि पलिकडच्या वर्गांत एक मुलगा रडक्या सुरांत एक कविता म्हणत होता—

‘ गरीब विचारा माधुकरी दुःख तयाला जन्मभरी...
कडक उन्हानें जीव घाबरे...’

मी आमच्या वर्गांतल्या बस्करावर शेवट बसलों होतों. काकडे गुरुजी गणित घालून स्वस्थ बसले होते खुर्चीत. मुलं कुरुकुरु गणित सोडवत होतीं. मी जाळींतून बाहेर बघत होतों. उन्हाच्या सणाक्यानें दोनतीन चिमण्या झाडाच्या फांदीवर बसल्या होत्या. जीव घाबरा होऊन त्यानीं डोळे मिटून घेतले होते. मी एकटक त्यांच्याकडे पाहात होतों.

अन् मग एकाएकीं गलका झाला. पोरंसोरं किंचाळलीं. थोरल्यांनीं गिल्ला केला. धडाधड् दारं वाजली कुणीतरी ओरडत होतं—‘ शाळा सोडून द्या...’ काकडे मास्तरांनीं घाईघाईनं वर्गाचं दार लावून आंतून कडी कोयंडा घातला. काय झालं कुणालाच उमजेना. आम्हीं घाबरलों. कांहीं मुलं रडूं लागलीं. एकाएकीं वर्गाच्या जाळींत एका बाईचा चेहेरा हंसूं लागला. मळवट भरलेली भेसूर चेहेऱ्याची ती बाई ओरडली—‘ मुलांना सोडून द्या...’ त्याचवेळीं घण् घण् घण् घंटा झाली. दारं उघडलीं. मुलं जीव घेऊन सैरावैरा पळूं लागलीं. फुटलेल्या वारुळांतून झरझर बाहेर पडणाऱ्या मुंग्यांसारखीं !

मी माझी जरीची टोपी आणि दप्तर सांवरीत कसातरी रस्त्यावर आलों. तेवढ्यांत माझ्या मानगुटीला धरून मला एका गांधी टोपीवाल्या माणसानं ढकलून दिलं. माझी जरीची टोपी खाली पडली. आणि भुईसपाट पडलेल्या त्या टोपीवरून मुलं वेडीवांकडी पळत गेली. माझ्या लहानग्या जिवाचा आंतल्या आंत तडफडत झाला. बोडक्या डोक्यावर हात ठेवून मीहि रडत पळत सुटलों.

तेवढ्यांत मला कुणीतरी हांक मारली, मी गोऱ्यामोऱ्या तोंडानं मागं वळून पाहिलं. इसाक त्या गांधी टोपी घातलेल्या माणसाशीं झोंबाझोंबी करीत होता. त्याच्या हातांतून तो कांहींतरी हिसकावून घेत होता. आणि तो इसम इसाकला मोकळ्या हातानें रद्दे ओढत होता. शेवटीं इसाक कांहींतरी हिसकावून घेऊन माझ्याकडें धांवत आला. माझं दप्तर त्यानं घाइघाईनं आपल्या हातांत घेतलं. माझा उजवा हात त्यानं घट्ट पकडला अन् तो म्हणाला—

“ चल, जोरांत धांव...”

जीव मुठींत घेऊन आम्हीं हरणासारखे धांवत सुटलों. तो पांढऱ्या टोपीचा माणूस लांब टांगा टाकीत आमच्यामागें येत होता. आम्हीं झपाट्यानें पुढच्या वळणावरच्या दत्ताच्या देवळांत शिरलों. इकडं तिकडं पाहून आम्हीं थेट गाभाऱ्यांत गेलों. आणि दत्ताच्या मूर्तिआड दडून बसलों. धडधडत्या काळजानं आम्हीं देवळाच्या मुख्य दरवाजाकडे पाहात होतों. थोड्याच वेळांत तो उंच जिराफ लगबगीनं देवळावरून पुढं गेला. आम्हीं एकमेकांकडे पाहिलं. गाभाऱ्यांत किती गार वाटत होतं !

गाभाऱ्यांत थोडा वेळ थांबून आम्हीं घराकडं निघालों. रस्त्यानं

अनुक्रमणिका







कुणी कुणाशीं कांहीं बोललं नाहीं. माझी टोपी गेल्याचं मला वाईट वाटत होतं. कांहींच घडलं नाहीं अशा थाटांत इसाक चालला होता. घरापाशीं आल्यावर एकाएकीं त्यानें हात पुढं केला. तो म्हणाला—

“ हें घर...”

मी पाहिलं. आणि वारं गेलेल्या माणसासारखा मी पाहातच राहिलो. मेलेल्या हातानं मीं माझा गळा चांचपला. तिथं कांहीं नव्हतं. आणि एकदम माझ्या बोडक्या डोक्यांत उजेड पडला. इसाकनं त्या माणसाशीं एवढी झटापट कां केली तें आतां समजलं. माझं ऊर आनंदानं भरून आलं. मी त्याला हांक मारली—

“ इसाक...”

“ घे...” तो म्हणाला.

“ तूंच अडकव. ” मीं त्याला म्हटलें.

त्यानं आपलं दप्तर डाव्या हाताच्या कोपरांत अडकवलं आणि माझ्या पाठीमागें उभं राहून तो ती अडकवूं लागला. दातानं तिचा फांसा घट्ट बसवून तो माझ्याकडे पाहात राहिला. मी पुन्हां एकवार चांचपून पाहिलं. माझी सोन्याची सांखळी मला मिळाली होती. भान न राहून मी घराकडं पळत सुटलों.

त्यानंतर आमच्या मैत्रीला धरबंध राहिला नाहीं. मैत्रीच्या नात्या-पुढें जाति-धर्माचीं बंधनें आम्हीं पार विसरून गेलों. मर्यादा सुटल्या. कृति मोकाट होऊं लागल्या. वारं प्याल्यागत आम्हीं हुंदडूं लागलों.

शाळा सुटली कीं घरीं आल्यावर गोट्याचा डाव पडे. फार रंगे डाव. दहाबारा पोरांच्या गलक्यानें आसपासचीं घरं कावून जायचीं नुसतीं. इसाक गोट्या फार सुंदर खेळे. आपला जुनवट अंगठा मातींत रोवून मधल्या बोटावरच्या आपल्या हाडकी गोटीनें तो समोरच्या गोटीला असा शेंदलायचा कीं पाहात रहावेसें वाटे. समोरची गोटी पिठी असेल तर तिचीं दोन दोन भकलं होऊन ती आभाळाकडे डोळे लावून पडे. नरमादीच्या डावांत तर इसाक कित्येक वेळां एकटा नर राहात असे. आम्हीं साऱ्या माद्या गलीकडे खुरडत असूं. अशात केव्हांतरी दिवस बुडून जायचा. पुन्हां एकदां शेवटचा ओरडा करून पोरं वातावरण दणाणून सोडत. डाव मोडला जाई. पोरं घरोघर निघून जात. इसाक माझा निरोप घेऊन जाई.

सुटीच्या दिवशीं इसाक आमच्यांत क्वचित् मिसळे. त्या दिवशीं त्याला घरकामांत लक्ष घालावें लागत असे. सारी दुपार तो गोंडे करण्यांत घालवी. आम्हीं कांहीं पोरं हातावर पाणी घेऊन त्याच्या घरांत जाऊन बसत असूं. पुढंच ओट्यावर त्याच्या घरांतील सारीं माणसं कांहीं ना कांहीं काम पुढ्यांत घेऊन बसलेली असत.

“ आओ, सावकार, आओ...! ”

समोरच गोंडे करीत बसलेले त्याचे म्हातारे वडील मला पाहून म्हणत. आमच्या घराच्यां दोन पिढ्या त्यांच्या डोळ्यांदेखत साव-कारींत गेल्या असल्यामुळें ते मला मस्करींत सावकार म्हणत असत. अन् मग विषय चालू होई. शेजारच्या पिकदाणींत एक गुळणी टाकून मग ते आमच्या जुन्या वैभवाबद्दल गोष्टी सांगत. आमच्या आजो-बांच्या दातृत्वाविषयीं, जुन्या नोकरमाणसांबद्दल, धमणीबद्दल आणखी नाना गोष्टींबद्दल ते बोलत राहात. अन्नाला जागलेला तो म्हातारा जणूं स्वतः विषयींच कांहीं बोलत असे. बोलतां बोलतां ते एकदम गंभीर होत. आमच्या वर्तमानकाळाविषयीं चुकचुकत. आणि शेवटीं आम्हां सर्वांना उद्देशून ते एक वाक्य बोलत—

“ नशीब का चक्कर है बेटे, देनेवाला जब देता है तो छप्पर फाडके देता है...नहीं तो...”

आणि वैतागून ते तयार झालेल्या गोंड्याला झटक्यानं गांठ देत !

त्यानंतरचा थोडावेळ विचित्र जात असे. उगीचंच गंभीर शांतता पसरे. कांहीं उपरं घडल्यासारखें आम्हीं बसून राहात असूं. इसाक आपल्या कामांत दंग असे. पुढ्यांतल्या खुंटाला अडकविलेल्या गोफा-वर तो रेशीम घाली. राहिलेल्या रेशमाला तो उजव्या हातांतील कात्री लावे. कर्रर आवाज होई. आंग टाकून रेशीम सळकन् इसाकच्या मांडीवर पडे. रिळाच्या रंगीत दोऱ्यानं तो गोंडा बांधे. राहिलेला दोरा तो दोन दांतांत धरून तोडी. तयार झालेल्या गोंड्याला तो टिचकी मारून खुलवी. आणि आमच्याकडे पाहून तो दिलखुलास हंसे.

मग इसाकचं तोंड उघडे. कुठल्या कुठल्या गोष्टींचा त्याच्याकडें सांठा असे. मोठ्या रसाळतेनं तो आम्हांला सांगत बसे. आणि अवधान देऊन आम्हीं ऐकत असूं. आधींच तो गोष्टीवेल्हाळ त्यांतून त्याच्या सांगण्याला एक विलक्षण शैली होती. बोल बोल म्हणतां आम्हीं त्यांत रंगून जात असूं. मधून मधून अस्सल शिव्या पेरत तो गोष्टी करूं लागला म्हणजे आमची हंसतां हंसतां रडायची वेळ येई. जत्रेवर पाहिलेल्या तमाशांतला एक संवाद तो नित्य आम्हाला सांगे—

सोंगाड्या अन् नायिका रंगांत आलेले असतात. कंबर लचकत लचकत ती गुलछडी बोलत असते. आणि तिच्या बोलाचा भलतांच अर्थ लावून सोंगाड्या तिच्या बोलण्यावर कडी करत असतो. बोलतां बोलतां ‘ चावटपना ’ करी. तिच्याशीं अंगलट करी.

“ चला की वाइच, झाडाखालीं...”

“ कशाला वो...? ” साळुंकीच्या सादांत ती विचारी.

“ वाइच सावलीला बसूं. ”

“ पन् कशापायीं...” ती आंग घुसळून विचारी.

“ वाइच गूज करूंया...” तो लाजत बोले.

दिवाळी अंकाची (अ) पूर्व तयारी : अति नव नव कवि



आम्ही ताडचित्रें लिहितों...!!!



अनुक्रमणिका



## माझ्या रक्तांत—

माझ्या रक्तांत लागतात दिवे,
जेव्हां पळसावर उतरतात
सूर्याचे थवे.

माझ्या रक्तांत भिजतें केशर,
जेव्हां मातींत भिनतें
कस्तुरीची सर.

माझ्या रक्तांत जळतात रंग,
जेव्हां पानोपानीं उमटतात
पोपटी तरंग.

माझ्या रक्तांत झुरतात सूर,
जेव्हां आषाढांत ओथंबतें
घनःश्याम काहूर.

माझ्या रक्तांत विर्घळते व्यथा,
जेव्हां दिठीत सांकळते
मिठीची कथा.

माझ्या रक्तांत दर्वळतें निःशब्द,
जेव्हां शब्दच बसतात हटवून
बोलायचे शब्द...

—सदानंद रेगे

सोंगाड्याचा याबेळीं एक डोळा मिटलेला असे. पुढं बसलेले श्रोते एकमेकांना दाबत हंसत. तेवढ्यांत नायिकेच्या दंडाला धरून 'पावण्यानं' तिला झाडाखाली आणलेली असते. संवाद पुढं चालू राहातो. पालथी मांडी घालत ती त्याला म्हणते—

"बोला..."

"काय...?" तो भारावलेल्या आवाजांत विचारतों.

गूज कां काय तें..." ती मुरकत म्हणते.

"बोलायचं व्हय...?"

असं म्हणून तो तिला चिकटतो. श्रोत्यांत कल्लोळ माजतो. सारं रान दणाणून निघते. नायिका झटकन् झाडाखालीं उभी राहाते. लोक शांत होतात. ती फणकाऱ्यानें म्हणते—

"चावटपना करूं नगा. फुढं वडिलमानसं बसलीत."

"हीं समूदी तुजी वडील मानसं काय?"

श्रोत्यांकडे अंगुली निर्देश करून तो तिला विचारी.

"व्हय कीं..." तिचा होकार येई.

अन् मग तो एक हात डोक्यावर ठेवून आणि दुसरा हात पोटाच्या खालच्या बाजूला ठेवून बोंबले—

"अगा या या बा ऽ ऽ ऽ..."

शिट्ट्यांच्या अन् टाळ्यांच्या आवाजांत तो संवाद संपे. हें सांगताना इसाक फार रंगात येई. हें मीं त्याच्या भाषेत सांगितलं. त्याच्या शब्दांत सांगायची आपली कांहीं ताकद नाहीं. मग पुढं वडील बसलेत याची त्याला मुर्वत नसे. वडिलांनाहि त्याचं कांहींच वाटत नसे.

कधीं कधीं तो भुताच्या गोष्टी सांगे. कराडचा नकटा खळ्या त्याचा आवडीचा विषय असे. मग गोष्टींवरून गोष्टी निघत. पाटीनें तुरुंगाच्या भिंती चढणाऱ्या रामोशी—महाराच्या अद्भुत कथा सांगे तर कधीं स्वतः पाहून आलेल्या सिनेमाची तो 'स्टोरी' लावी. हें सारं ऐकतांना दिवस किती आलायू आम्हांला कळायचं नाहीं. सावल्या लांबायच्या. आमच्या घरांतून आम्हांला हांका यायच्या. मग गप्पा थांबत. घरांतल्या माणसांवर आम्हीं चरफडत उठायचों. इसाकचेंहि गोंडे पुरे झालेले असायचे. अंगावर उघसलेलं रेशीम वेंचीत तो आवराआवरी करूं लागे. आम्हीं भरल्या मनाने घरीं चालूं लागत असूं.

इसाकला सिनेमा पाहण्याची भारी हौस. भारी नादावला होता. गांवांत लागलेला एक सिनेमा कांहीं त्याचा चुकत नसे. घरीं येतांना तो कुठलं तरी गाणं म्हणत आला कीं समजावें तो सिनेमा पाहून आलायू. मग तो गाण्यासह त्याची आम्हांला चित्तरकथा सांगे. यामुळें बरीच गाणीं पाठ येत असत त्याला. पुढें आम्हीं त्याला 'हनमंता' म्हणूं लागलों. 'देव पावला' या चित्रपटांतलें 'हणमंता, माझ्या हणमंता...' हें गीत तो फार छान म्हणे. आणि तें गाणं म्हणत असतांना तो अभिनयहि फार छान करे. हुबेहुब नक्कल बठवीत असे. म्हणून त्याला आम्हीं 'हनमंता' म्हणत असूं. माझा आवाज मुळांत गोड. पण मला सबंध गाणं एकहि येत नसे. चारचौघं जमले कीं त्याला त्या गाण्याचा आग्रह होई. आणि तोहि तें मोकळ्या आवाजांत



अनुक्रमणिका

म्हणे. पुन्हां त्याला दुसऱ्या गाण्याचा आग्रह होई. मला त्याचा हेवा वाटे.

पुढं केव्हांतरी त्याची शाळा सुटली. आणि तो धंद्यांत पडला. मीहि इंग्रजी शाळेंत येऊन दाखल झालों. नव्या गोष्टींत रंगून गेलों. इसाकची माझी गांठ क्वचित् केव्हांतरी पडूं लागली. कारण तो नजीकच्या खेडेगांवांतून बाजाराला जाई. सोमवारी परळीला तर मंगळवारी लाटण्याला असा तो सायकलवरून बाजार करी. दिवसभर उन्हांत बसून तो आपला माल खपवी. जे कांय चार पैसे मिळतील तें घेऊन तो सायकलवर टांग टाके. घरीं येईपर्यंत दिवस मावळून जायचा त्याला. चांगला अंधार पडत असे. मग हातपाय धुवून जो मिळेल तो भाकरतुकडा खाऊन झोपीं जाई. आमच्या भेटींत खंड पडूं लागला.

दिवस चढत होते अन् उतरत होते !

एक दिवस माझ्याकडे तो आला. सुटीचा दिवस होता. दुपारची वेळ होती. हातांत एक धारदार कोयता अन् गुंडाळलेला एक कासरा घेऊन तो माझ्यापुढं उभा होता.

" चल डोंगरांत..." तो म्हणाला.

" कशाला ? " मी हबकून विचारलें.

मोळी आनायल..."

" पण...मला जमेल कां...? "

" पान्यांत पडलं कीं पवायला येतं. चल..."

मी न बोलतां निघालों. रहाटाच्या जुन्या दोराचे तुकडे आणि डोक्यावर ठेवायला चुंबळीसाठीं एक टॉवेल घेऊन मी त्याच्या मागोमाग निघालों. माझ्यासाठीं त्यानं आणखी एक धारदार कोयता आणला. आणखी कांहीं कांहीं गोष्टीं घेऊन आम्हीं निघालों. बरोबर सोनाराचा शंकरहि होता.

चढउताराबरोबर त्याचीं बोलणीं बदलत होतीं. नाना विषय रंगत होते. जळक्या उन्हांतून तीन जीव मोठ्या मजेंत चालले होते. सावल्यांची आवश्यकता कुणालाच वाटत नव्हती. इसाक मला अश्लील गोष्टी सांगून झपाझप रस्ता कांपत होता. मलाहि तरण्या-ताठ्या पोरींच्या गोष्टीं ऐकतांना बरें वाटत होतें. गुदगुल्या होत होत्या. भुसकुट पडेपर्यंत मी हंसत होतों. लहान करडासारखा त्याच्या मागं धांवत चाललों होतों.

गोष्टी करतां करतां आमचं ठिकाण आलं. सांबरवाडीचा डोंगर आला. डोंगरकपारीच्या पाऊल वाटेनं चालतां चालतां इसाक मधेंच थांबला अन् म्हणाला—" आलं बरं कां, आपलं ठिकान. "

मीं मागं वळून पाहिलं. गांव कुठं दूर राहिलं होतं. निळ्या आभाळाखालीं उंच डोंगरांत आम्हीं उभे होतों. उंच उंच झाडं एका पायावर उभीं राहून उन्हं घेत होतीं. दूरवर कुठं तरी तांबट घरटं तयार करत होता. त्याचा ठॉक्...ठॉक् आवाज साऱ्या कपारींत घुमत होता. मधून मधून व्हला हुंकारत होता. पांखरांचा एक मोठा थोरला थवा भर्रर्कन् आमच्या डोक्यावरून गेला. मला आंत आंत कुठं तरी धन्य वाटत होतं.

" आटपा. मग बघा. दिवस उतरूं लागलाय्..."

मी लाजलों. इसाककडं पाहिलं. अन् चमकलों. पाऊलवाटेला खेटून असलेल्या एका धोंड्यावर त्यानं आपला सदरा, टोप्या, पायां-तल्या वहाणा आणि तयार केलेली चुंबळ ठेवली होती. हातांत चकाकता कोयता घेऊन उघड्या अंगानं इसाक माझ्यापुढं उभा होता. त्याचं पिळदार शरीर पाहून मलाहि अंगांतला सदरा काढा-वासा वाटला. मीहि माझ्या इतर चीजवस्तू त्या धोंड्यावर ठेवून त्याच्यामागून चाललों.

डोंगर उतरणीला असलेल्या कारव्यांच्या जंगलांत आम्हीं उतरूं लागलों. माझी चप्पल मधेंच घसरे—

" ध्येतानं..." तो मला इशारा देई.

सोनाराचा शंकर अन् तो सराइतासारखे उतरत होते.

कारव्या आतां चांगल्या पोसल्या होत्या. पुरुष दीडपुरुष उंच झाल्या होत्या. बुंधा तर तयार झालेल्या ऊंसासारखा झाला होता. आज चांगलं जळण मिळणार होतं. इसाकला बरें वाटलें.

" हं, घ्या देवाचं नांव अन् हाना घाव..."

असं म्हणून तो कारव्या तोडूं लागला. डाव्या हातानं चारपांच रोपं हातांत धरून तो बुंध्यांत सपासप घाव घालूं लागला. आंग मुरगाळून कारव्या खालीं पडूं लागल्या. बोल बोल म्हणतां त्यानं बरीच कामगिरी केली. सोनाराचा शंकरहि तसाच तयार. कांहीं न बोलतां तो कारव्या खाली पाडूं लागला. चपचपल्या उन्हांत त्यांची घामेजलेलीं शरीरं बघून मलाहि इसाळ आला. कसल्यातरी इर्ष्येनं मी घांव घालूं लागलों. दोन तीन घावांत एखादी कारवी खालीं पडूं लागली.

अर्धा घंटा तसाच गेला. कोयत्यांचे घाव, कोसळून पडणाऱ्या कारव्यांचे आवाज आणि पानांचा सळसळाट यांनींच तिथली शांतता मोडली गेली. कांहीं काळ त्याचेच आवाज होत राहिले. मुक्या डोंगरांत त्याचे पडसाद उठूं लागले.

तोडलेल्या कारव्या इसाकनं दोन तीन खेपांत वर आणल्या. आणि पाऊल वाटेवर टाकल्या. सपासप पानं कापून त्यानं त्या

भुंड्या केल्या. झपाझपा तो मोळ्या बांधूं लागला. आडव्या दोऱ्यांवर उभ्या कारव्या घालून त्यानं स्वतःची मोळी एखाद्या सुरेख वळकटी सारखी बांधली. डोंगरउतारावरून सोडून दिली तरी सुटायची नाहीं. मी बघत होतों. उठून त्याची मोळी उचलूं लागलों. एक वीतभर कांहीं उचलली नाहीं. तो फक्कन हंसला. आपल्यांतल्या कांहीं कारव्या भरीला घालून त्यानं माझी लहानशीं मोळी बांधली आणि हातांतले कोयते त्यानें आपल्या मोळींत जाम खुपसून ठेवले.

डोक्यावर चुंबळ ठेवून शंकर सोनार दोन पायावर बसला होता. त्याची मोळी 'उशीर' तयार झाली होती. डाव्या हातावर तंबाखु मळत तो झाड्याला बसल्यासारखा बसला होता.

"काय् खुळा कां कायरे शंकर..."

सोनाराला कांहीं कळलं नाहीं. तो वेड्यासारखा इसाककडे बघत राहिला. "आरं शान्या, भाकरी खायची सोडून तंबाकू मळत बसलायूस! काय म्हणावं तुला..."

मी चपापलों. सोनार उमगला. तटकन् तो दोन पायावर उभा राहिला. मळलेली तंबाखु त्यानं पुन्हां पुडींत टाकली. इसाकनं बरोबर भाकरी आणली होती. भाकरीचं फडकं तो सोडूं लागला तसा भुकेल्या पोटाने मी त्याच्याजवळ जाऊन बसलों.

तव्यावर तरपलेली कसली तरी भाजी आणि ती जाड भाकरी त्यानंतर अजून मला खायला मिळाली नाहीं. अजून त्याची चव तोंडांत रेंगाळती आहे. माणूस ही एकच जात आणि भूक हा एकच धर्म मी त्यावेळीं जाणला होता!

फडकं झटकून आम्हीं उठलों. पलीकडच्या घळीतलं निव्वळ शंख पाणी खालीं वांकून हाताला तोंड लावून प्यालों. तोंडावरून गार पाण्याचा हात फिरविला आणि गडबडीनें निघालों.

माझ्या टॉवेलाची चुंबळ तयार करून इसाकनं ती माझ्या डोक्यावर आणि त्यावर माझी मोळी हलकेंच ठेवली. क्षणभर माझा तोल गेला, पाय लटलटूं लागले. इसाकनं त्याची मोळी उभी केली आणि पाहिजे तिथं डोक्याचा टेकू देऊन त्यानं झर्रदिशीं ती तोलून धरली. उन्हानं तापलेल्या आपल्या कोंकणी वहाणा कर्र...कर्र...वाजवत तो झपाट्यानं चालूं लागला. अवघडलेल्या मानेनं मीं त्याच्या मागं रखडत चालूं लागलों. डिकाव् डिकाव् करीत शंकर सोनार केव्हांच पुढं झाला होता.

बराच वेळ आम्हीं चालत होतों. दिवस आतां चांगला घरंगळूं लागला होता. डोंगरांतला गार वारा सुटला होता. आणि पांखरं घोळ करून झाडांझाडांवर जमली होतीं. कलाकला करीत होतीं. तेवढ्यांत कुठून तरी–' हर्रर...हर्ररयें...' असे बायकी स्वर आले.

दोनचार करडं पुढं घालून डोक्यावर मोळी घेतलेली एक तरणी बांड कुरवाड्याची पोर आमच्याकडे येत होती. पलीकडच्या मळईतून ती आम्हांला येऊन मिळाली. काळीसांवली पण गच्च भरलेली ती पोरगी पाहून इसाकच्या तोंडाला पाणी सुटलें. आणि तें शब्दांवाटें बाहेर पडूं लागले.

मागून उघडी दिसणारी तिची पाठ आणि त्याच्याच खालीं रुळणारी कासोट्याची चार बोटाची पट्टी पाहून मलाहि कसेंसें होऊं लागलें, अंगावरला केंस न् केंस ताठ झाला.

इसाक तर अचकट विचकट बोलत होता. ती मुलगी आमच्याकडे लक्ष न देतां लगालगा चालली होती. इसाकनं मधेंच एक लावणीचा चरण म्हटला—

'पुरं पांखरा खुळी करामत, थांबच बिनबोभाट...'

आम्हीं तिघंहि खदाखदां हंसलों.

"अहो बाई, आपन कोनच्या गिरनीचं पीठ खातां?"

इसाक तिच्या सुदृढ प्रकृतीला उद्देशून बामनाची नक्कल करीत म्हणाला, पुन्हां आम्हीं खिदळलों. माझी मोळी खाली पडायच्या बेताला आली. शेवटी इसाक ओरडला, "अग, ए, चुंबळे..."

तसा रंग पालटला. लगालगा चाललेली ती पोर थांबली. डोक्यावरची मोळी तोलून धरत तिनं मागं वळून पाहिलं. आणि उंच स्वरांत ती किंचाळली.

"कां रं, ए, भाड्या. कां आयाभनी जळल्या कां...?"

तिच्या ओरड्यानें मी गपकन् उभाच राहिलों. डोक्यावरची मोळी रप्दिशीं वाटेवर पडली. इसाकनं तोंड उघडलं—

"काय, ग, ए, पतीव्रते, तुला कोन म्हनतंय? मोळी खालची चुंबळी निसटली तिला बोललों कां तुला?..."

त्यावर ती पुढं काय बोलली मला आतां आठवत नाहीं. त्या दिवशीं घरीं यायला अंधार झाला. दिवेलागण होऊन गेली. पुढें दोन दिवस वर मान करून मी माझ्या आईकडे पाहूं शकलों नाहीं. तो तरंगता दिवस अजून मला आठवतो. तो दिवस फार लवकर मावळला.

एक दिवस मला कळलं, इसाक आपल्या आईबरोबर गांव सोडून निघून गेला.

इसाकाच्या घरांत बानू नांवाची त्याची एक मावसबहीण रहात असे. तिचे आईवडील तिच्या लहानपणींच वारल्यामुळें इसाकच्या आईवडीलांनीं तिचा सांभाळ केला होता. आपल्याच पोरांसारखीं वाढविली होती. अलिकडे ती वयांत आली होती. त्यांतून ती दिसायला फार सुंदर होती. सोललेल्या कर्दळीसारखं तिचं अंग न् अंग दिसायचं. आभाळाकडं पाहात घरचीं धुणीं, भांडी करतांना ती मला अधूनमधून दिसायची.

केव्हां आणि कशी कोण जाणे! कोणा एक दुष्ट माणसाच्या बलात्काराला ती बळी पडली होती. कामराक्षसानें तिला एकाच घासांत गिळून टाकलं होतं. तिच्या दुष्ट चक्राची गति तिला कुठं नेणार होती? एक लहान जीव तिच्या जीवावर उठला होता. कोयीनं झाड गिळलं होतं.

आणि त्या साऱ्याची उस्तापास्त करायला इसाक आणि त्याची आई तिला घेऊन गांवापासून दूर गेले होते!

वर्ष सहा महिने झाले. पावसाळा घेऊन इसाकची आई आपल्या राहात्या घरीं परतली. एकटीच आलेली बघून माझ्या काळजांत लक् झालं. मी आतां मोठा झालों होतों. घरीं जाऊन थोरल्या माणसासारखी मी चौकशी केली. डोळ्यांत पाणी आणून तिनं सारी कथा मला सांगितली. मला वाईट वाटलें. अवेळी झालेल्या बाळंतपणांत बानूचा अंत झाला होता. घडलेल्या चित्तरकथेंत तिचा कांहींच अपराध नव्हता.

अनुक्रमणिका

इसाकहि इतक्यांत परत येणार नव्हता. आपल्या मेव्हण्याच्या घरीं तो कामाला राहिला होता. त्याच्या मेहुण्याचा अंड्यांचा धंदा जोरांत असे. त्यांत त्याला चांगली बरकत होत असे. अंड्याच्या मोटमोठ्या करंड्या इकडून तिकडे पोंचत्या करण्यासाठीं मेहुण्यानं त्याला ठेवून घेतलं होतं. इसाकहि मोठ्या खुषीनें राहिला होता. वरखर्चाला त्याला लागेल तसा पैसा मिळत होता. तो चैनींत होता. त्याचा प्रवासाला सुरुवात झाली होती.

दिवसानं दिवस पुढं चालले होते. मी माझ्या अभ्यासांत, मित्रांत आणि शहरी जीवनांत पार मिसळून गेलों. माणूस डोळ्यापुढं वावरत नसला म्हणजे त्याचा विसर पडतो. नवीन गोष्टींच्या ओझ्याखालीं त्याची आठवण पार दबली जाते. इसाक माझ्या डोक्यांतून निघून गेला. त्याचं घरहि मला सुटलं.

वर्षाचे बारा महिने गेले! वर्षे दोन पुरी झालीं! आणि एका अवेळीं मला कळलं कीं, इसाकला पोलिसांनीं धरून नेलं. अंड्याच्या टोपल्यांतून चोरट्या अफूचा धंदा केल्याचा त्याचावर आरोप ठेवला गेला. ही सारी त्याच्या साल्याची करामत होती. मेहुणा सुटला. इसाकला दहा महिन्याची शिक्षा झाली. हातांत कड्या अडकवून त्याला खडी फोडायला जुंपला. झालेला दंड भरून मेहुण्यानं पुन्हां आपला उद्योग चालू केला. मला वाईट वाटून काय उपयोग होता? एकदां फांसा उलटा पडला कीं वनवास ठेवलेलाच असतो.

इसाकला शिक्षा झाली तेव्हां गांवापासून मी दूर होतों. इंग्रजीची शेवटली परीक्षा पास झाल्यावर नोकरीसाठीं मी मामाच्या गांवीं गेलों होतों. नोकरी मिळाली तर ठीकच नाहीं तर पुन्हां उन्हाळा सोसायला आपला गांव बघायचा असं मी ठरविलं होते. पण नोकरीहि मिळाली नाहीं आणि मी वर्षाअखेरीला परतहि येऊं शकलों नाहीं. दिवसगत लांबून दोन वर्षे मामाकडं माझा मुक्काम झाला. आणि मग दुसऱ्या वर्षाच्या शेवटाला घराच्या ओढीनें मी राहात्या घरीं परतलों. इसाकची सुटका केव्हांच झाली होती.

साऱ्यांच्या चौकशीबरोबर त्याचीहि खुशाली मी माझ्या घरांत केली. तेव्हां मला कळलं कीं तो पुन्हां पहिल्यासारखे आसपासचे बाजार करूं लागला आहे. आठवड्याचे साती दिवस तो कुठल्या कुठल्या खेड्याचे बाजार करीत होता. आपल्या डोळ्यांवर झांपड आलं. आपण आंधळे झालों म्हणून दिशा चुकलों. आपले बुजुर्ग ज्या वाटेनं गेले तीच वाट आपली. चाकोरी सोडली कीं अपघात होतो अशी त्यानं आपल्या मनाशीं खुणगांठ बांधली होती. आणि वडिलार्जित धंद्यांत त्यानं पुन्हां प्राण ओतले होते. पण दोन महिने झाले त्याच्या पायाला कांहींतरी लागल्यानें तो घरींच होता.

एका दुपारीं मी आमच्या दारांत उभा होतों. हिंवाळ्याचे दिवस होते. दुपारच्या उन्हाचा त्रास वाटत नव्हता. मीं सहज पलिकडे पाहिलं तों इसाक त्यांच्या आंगणांत उभा होता. जावं कीं नको अशा विचारांत असतांनाच माझी पाऊलं तिकडं वळलीं. आभाळांत कुठं-तरी पाहात तो कसल्यातरी विचारांत होता.

" अदावत है, खानसाहब...!"

मी त्याच्या दाढीला उद्देशून बोललों. त्यानं चमकून माझ्याकडं पाहिलं. त्याचा चेहरा उजळला. वाढलेल्या दाढींतून एक कंगाल हसूं बाहेर पडलं. मी त्याच्याकडं पाहिलं. शरीरानं तो पार उतरून गेला होता. थंडीत वठलेल्या झाडासारखा झाला होता.

मी त्यांच्या सारवलेल्या आंगणांत उतरलों. माझे डोळे सहज घरांत डोकावले. त्यांच्या पुढच्या सोप्याला मधेंच फळ्या ठोकल्या होत्या. आणि एक स्वतंत्र खोली तयार केली होती. मी त्याला गंमतीनं विचारलं—

" काय इसाक, घरच्या वांटण्या केल्या वाटतं..."

सहज विचारलेल्या माझ्या प्रश्नानं त्याचं तोंड उतरलं.

" व्हय तर. आमचा हिस्सा आमाला कवाच मिळालाय्..."

खालीं मान घालून त्यानं उत्तर दिलं. झालेल्या शिक्षेबद्दल तो बोलला होता. मला वाईट वाटलं. त्याला धीर द्यावा म्हणून मी पुढं झालों. त्याच्या खांद्यावर हात ठेवून मी कांहीं बोलणार तोंच तो मागें झाला. आपला दुसरा पाय जमिनीला घांसत मागें नेत तो म्हणाला,—

" हां...हां...मला शिवूं नगस, बाबा. मला महारोग झालाय्..."

मला एकदम धसका बसला. मेंदूत कुठंतरी कळ उठली. तटकन् मागं होऊन मीं त्याच्या हातांपायांकडं पाहिलं. त्याची हाताचीं बोटं वेडीवांकडी झाली. आणि फडकं बांधलेल्या त्याच्या पायांवर लाल सूज आली होती. इसाक एक महारोगी झाला होता. माझं रक्त मला आटल्यासारखं वाटलं. आवंढा गिळून मी कोरड्या आवाजांत विचारलें—,

" कशानं...रे...?"

त्यानं माझ्यांकड पाहिलं. आणि खोल गेलेल्या आवाजांत तो बोलूं लागला. शेंवटची घरघर लागलेल्या माणसासारखा तो बरळत होता. माझ्या कवटीवर तडे पडत होते—,

" अपना खूनहि वैसा है, पमा! संगत कितीबी चांगली भेटली तरी आमच्या रग्ताचा गूनच त्यो. बकऱ्याचं काळीज खाऊन खाऊन माणसाचं काळीज गमवून बसल्यालों धोंडं आमी. झिजून झिजून मरनार मी आतां. शाप हायेत मला त्ये. मरत्या वक्ताला बानूच तसं बोलली हुती..."

● ● ●

दिवाळी अंकाची (अ) पूर्व तयारी : नव कवि



आमच्या काव्याचा इतिहास आणि भूगोल




१ सप्टेंबर १९३७ रोजीं महाराष्ट्राचें एक थोर कवि आणि जुन्या मराठी वाङ्मयाचे व्यासंगी श्री. ज. के. उपाध्ये यांचें शोचनीय निधन झालें. 'बुवा' उपाध्ये हे साक्षात् विनोदाचे अवतार होते हें आधुनिक पिढीला माहित नाहीं. १९३७ च्या जोत्स्ना मासिकाच्या नोव्हेंबरच्या अंकांत बुवांचे मित्र प्रा. न. र. फाटक यांनीं आपल्या जिवलग मित्राचा करून दिलेला हा परिचय —

# कै. जयकृष्ण केशव उपाध्ये

—प्रो. न. र. फाटक, बी. ए.

ता. १ सप्टेंबर १९३७ रोजीं मध्यरात्रीच्या सुमारास नागपूरचे कवि जयकृष्ण केशव ऊर्फ उपाध्ये बुवा इहलोक सोडून गेले. उपाध्यांना त्यांच्या स्नेही मंडळींत 'बुवा' या नांवानेंच प्रायः सर्वजण ओळखीत असत. बुवांच्या आयुष्याचा जवळ जवळ निम्मा काळ हाल अपेष्टांतच गेला होता. अगदीं लहानपणीं आई वारली, व या तान्ह्या मुलाचें संगोपन त्यांच्या आजोबांनी—नानाजींनी केलें. बुवांचे वडील फार कठोर स्वभावाचे होते. बुवांच्या दृष्टीस कधीं पितापुत्राचा प्रेमसोहळा दिसला म्हणजे त्यांस आपल्या पित्याच्या खाष्ट वर्तनाची आठवण होऊन "असें पितृसुख आपल्या भाग्यांत नव्हतें. बापानें रागावून अंगावर जो काय हात टाकला असेल तोच काय तो आपल्या परिचयाचा, प्रेमानें अगर ममतेनें कधीं त्यानें पाठीवर हात फिरविल्याचें स्मरत नाहीं." अशा अर्थाचे उद्गार काढावे आणि प्रसंगविशेषीं डोळ्यांतून आसवेंहि गाळावीं. आजोबांच्या प्रेमाची जाणीव मात्र त्यांनी शेवटपर्यंत बाळगली होती. त्यांचे आजोबा चांगले व्युत्पन्न होते; मोरोपंत, वामन इत्यादि इतिहासकालीन कवींचा परिचय लहानपणींच बुवांना आजोबांच्या शिकवणीनें झाला होता. आजोबांच्याबरोबर किर्तन पुराण श्रवण करण्याची बुवांना गोडी लागली होती. बुवांच्या स्वभावाला यामुळें भाविकपणाचें वळण लागलें व तो भाविकपणा शेवटपर्यंत कायम होता.

## बुवांच्या कल्पकतेचा मासला.

परंतु बुवांना भाविकपणाच्या बाहेरच्या आडदांडपणाचा देखील अनुभव फार होता. त्यांच्या लहानपणीं मुलांना हूडपणा करण्याचें भूषण वाटत असे. कुरापति काढून मारामाऱ्या करणें, दांडगाईचे खेळ खेळणें – म्हणजे झाडावर चढणें, पोहणें, शिमग्यांत चोऱ्या करणें, वगैरे खेळांत भाग घेतल्यानें बुवांच्या भाविकपणाची संरक्षण करणारी धाडसाची व सशक्तपणाची बाजू चांगली तयार झाली होती. ते आपल्या लहानपणांतील हूडपणाच्या गोष्टी सांगू लागले म्हणजे तसा हूडपणा आजच्या पिढींत नसल्याबद्दल सखेद विस्मय वाटल्याशिवाय रहात नसे. बरोबरीचे सगळे सोबती हूडपणांत वाकब असल्यानें एकमेकांवर कडी करण्याची चढाओढ त्यांच्यामध्यें नेहमी चालून कल्पकतेचा गूण बुवांच्या स्वभावांत आपोआपच पोसला जाऊं लागला, आणि पुढच्या आयुष्यांत तो त्यांना पुष्कळ वेळा उपयोगी पडला. बुवांची स्वारी तीर्थयात्रा करीत असतां अयोध्येस गेली. तेथें कैकेयींचें क्रोधागार या नांवाचें एक स्थळ भुयाराप्रमाणें जमिनीखालीं आहे. त्याच्या दारावर बसलेल्या इसमानें पैशाची मागणी केली व ती पुरविल्यास आंत जाता येईल असें बुवांस बजावलें. बुवांना त्या इसमाचा राग आला व त्याच्या अरेरावीची खोड मोडण्याकरितां त्यानीं जवळच्या दुकानांतून फुटाणे विकत घेतले. अयोध्येस रामाच्या सेनेचा—माकडांचा सुकाळ आहे. फुटाणे विकत घेतल्यावर बुवांनी ही सेना जवळ बोलाविली व हळूहळू ती कैकेयीच्या क्रोधागाराशीं आणली. पुन्हां एकदां काकुळतीनें आंत जाऊं देण्याकरितां द्वारपाळास विनवून पाहिलें, पण तो पहिल्यापेक्षां अधिक चढेलपणानें बोलूं लागला. इतक्यांत हातांतील फुटाण्यांची पुरचुंडी सोडून बुवांनी क्रोधागारांत भिरकावली. फुटाण्यामागें माकडांच्या झुंडी क्रोधागारांत शिरल्या. त्यांच्या धांवपळींत त्या चढेल द्वारपाळाला माकडांनीं लोळविलें. बुवा द्वारपाळाची धांदळ पहात उभे होते. तो विरमला होता. त्यानें बुवांपाशीं फारशी वटवट केली नाहीं. माकडें बाहेर आल्यावर शांतपणें बुवा त्या क्रोधागाराचें दर्शन घेऊन आले. बुवांच्या खोडकरपणाच्या अशा आणखी पुष्कळ कथा सांगतां येतील. त्यांच्या कल्पकतेचा मासला म्हणून ही एक गोष्ट सादर केली आहे.

## परमार्थ साधनेला सुरवात

कांहीं शिक्षण व कांहीं खेळ अशा दुहेरी रीतीनें आजोबांच्या छत्राखालीं बुवांचें बालपण बऱ्याच आनंदांत गेलें, परंतु आजोबांचें छत्र

घेऊन पडल्यानंतर बुवांच्या मनोवृत्तींत क्रांति सुरू झाली. बुवांना एकांतवास रुचूं लागला. एकांतवासांत "आपण जगतों कशासाठीं ?" या प्रश्नावर ते विचार करीत. देवाच्या अस्तित्वाचा विश्वास या दिवसांत डळमळूं लागला. केव्हां केव्हां तर आत्महत्या करून घेऊन मोकळें व्हावें असें बुवांच्या मनांत येत असल्याचें बुवा सांगत असत. त्यांची एका गुरुमहाराजाशीं गांठ पडून देव जोडण्याकरितां बुवांनीं त्या गुरुजीच्या तालमींत परमार्थाच्या अभ्यासाला प्रारंभ केला.

बुवांच्या वडिलांना या गोष्टीचा इतका धक्का बसला कीं, मुलाचा पत्ता लागत नाहीं अशी खात्री होतांच त्यांची प्रकृति खंगत चालली व त्यांचें देहावसान झालें. बुवांना पित्याच्या मृत्यूची वार्ता एका चुलत्यानें बऱ्याच दिवसांनीं पुढें कळविली. बुवांनी पित्याला सद्गती मिळण्यासाठीं उशिरा कां होईना पण जुन्या समजुतीस अनुसरून उत्तरक्रिया केली. पित्याचें नांव बुवांनी आधीं टाकलें असलें तरी त्याचें स्मरण त्यांना पुष्कळदां पाशासारखें वाटत असे. पित्याचें निधन झाल्यावर हा पाश तुटला व गुरुजींच्या उपदेशाप्रमाणें अगदीं एकांतिक निष्ठेनें परमार्थाच्या साधनांत गर्क झाले.

## बुवांचा गृहस्थाश्रम

परमार्थसाधन करीत असतां त्यांना गुरुजींच्या रहाणींत दांभिकपणा दिसूं लागला. त्यायोगानें त्यांची श्रद्धा क्षीण होत चालली व त्यांना जेव्हां दांभिकपणाचा कडेलोट आढळला तेव्हां मानवी गुरुविषयीं चीड उत्पन्न होऊन ते तीर्थयात्रेस निघाले. तीर्थयात्रेंत कोणी परमार्थाचा खरा अधिकारी पुरुष भेटेल व आपलें कल्याण करील अशी बुवांची भावना होती. कोठें पायीं, तर कोठें वाहनांच्या सहाय्यानें बुवांचें भ्रमण कांहीं काळ चालू राहीलें. बुवांना तीर्थावरील पवित्र अंशाबद्दल आदर वाटावा तर तीर्थांच्या ठिकाणीं पवित्रपणाच्या अंशापेक्षां कितीतरी जास्तपटीनें दृष्टीस पडणाऱ्या लफंगेपणानें उद्वेग व्हावा. मथुरेस श्रीकृष्णाबद्दल भक्तिभाव यात्रेकरूंनी दाखवावा, आणि त्याच्या आधारावर तीर्थस्थ स्वार्थलंपटांनीं त्यांची नागवणूक करावी, अशा अनुभवांनी बुवांच्या मनोवृत्तीला हिसके बसतां बसतां एकदां त्यांच्या मनाच्या निश्चय झाला कीं तीर्थमंदिरें हीं सारीं स्वार्थी लफंग्यानीं भाविकांनां लुटण्याकरितां निर्माण केलेलीं साधनें आहेत. इतःपर हें सारे झूट समजावयाचें आणि सर्वसामान्य लोकरीतीस अनुसरून प्रपंच करावयाचा. असें त्यांच्या मनानें पक्कें घेतल्यावर बुवांनीं आपल्या पारमार्थिक वेषास रजा दिली व नागपुरास निर्वाहाचा उद्योग पहाण्यासाठीं राहिले. नागपूर हें त्यांचें जन्मस्थान. तेथें त्यांचा स्नेहपरिवार मोठा होता. यामुळें बुवांना पोट भरण्यापुरता उद्योग मिळण्यास फारसा विलंब लागला नाहीं. परंतु हावेळपर्यंत त्यांना लग्न करण्याची इच्छा झाली नव्हती, ती इच्छा पूर्वाश्रमांतील गुरुपत्नीनें उत्पन्न केली व त्या बाईनें तावडतोब ती सार्थकीं लावून टाकली. मातृप्रेमाच्या अभावीं गुरुपत्नींच्या प्रेमळपणाचा बुवांच्या चित्तावर विलक्षण परिणाम झाला होता. ते ह्या बाईला आईसारखे मानीत व तिचा शब्द मोडीत नसत. ह्या बाईकडे एक उपवर मुलगी होती. तिच्यासाठीं बाईनें बुवांची योजना केली आणि बुवांचें लग्न करून दिलें.

## अस्सल कवित्व

बुवांचा गृहस्थाश्रम दहावर्षांहून जास्त दिवस टिकला नाहीं. त्या अवधींत बुवांचीं अपत्यें व पत्नी यांचा अंत होऊन बुवा पुनश्च प्रपंचांतून

मोकळे झाले. येथून पुढें बुवा कविता करूं लागले. बुवांत कवित्वाची शक्ति फार लहानपणापासून होती, परंतु प्रपंचांतील सुखस्मृतींचा दुःखकारक आवेग नष्ट करण्याला ही कवित्वशक्ति उपयोगी पडली. त्यांनीं टिळकांचें ओवीबद्ध चरित्र लिहून काढण्याचें काम सुरू करून प्रपंचाचे स्मरणाला थाराच राहूं दिला नाहीं. टिळकांचीं ओविबद्ध चरित्रें आणखी आहेत, परंतु बुवांच्या टिळकचरित्राची जादू दुसऱ्या कोणत्याच तसल्या चरित्रांत सांपडावयाची नाहीं. या चरित्राच्या पूर्वार्धापेक्षां उत्तरार्ध ( यांची पूर्ण रचना झाली नाहीं, व तेवढी रचना अप्रकाशीत आहे ) अधिक सरस उतरला आहे. बुवांच्या कवितांचा संग्रह पाहूं गेल्यास इतर कित्येकांच्या तो पासंगासहि भरणार नाहीं. काव्यरचनेच्या प्रमाणावरून कवित्वाचा योग्य निर्णय करणारे बुवांना अगदींच कःपदार्थ ठरवितील. पण बुवा जातिवंत कवि होते, केवळ वृत्तबद्ध शब्दरचना करणारे कारागीर नव्हते. त्यांच्या संवादांत काव्य म्हणून दाखवितां येतील असे कितीतरी चुटके सहज निघून जात असत. त्यांनीं आपल्या कवितेमधें विडंबनाचा प्रकार बराच खेळविला आहे. परंतु हीं विडंबनें त्यांनी चटोरपणाची हौस भागविण्यासाठीं लिहिलेलीं नसून दांभिकपणाला शासन लावण्याकरितां रचिलेलीं आहेत. बुवांनीं जगाच्या विविध अनुभवांत यथेच्छ बुड्या मारल्या असल्या तरी त्यांच्या स्वभावांत निष्कपट भाविकपणा धुवून टाकलेला नव्हता. आत्मौपम्यानें जगसुद्धां प्रामाणिक आहे, असा त्यांचा समज होत असे. ज्याच्या प्रामाणिकपणाचा विश्वास वाळगला तोच कावेबाज ढोंगी आहे असें त्यांना उमगलें म्हणजे त्याचा त्वेष येत असे व अशा त्वेषाच्या भरांत त्यांनीं कित्येक विडंबनें लिहिलीं आहेत. त्या विडंबनाचा परिणाम होत नसे असें नाहीं. एकदां त्यांनीं एका लेखकाची वाक्यावाक्यागणिक ग्रंथाधार सांगण्याची खोड उघडकीस आणण्यासाठीं 'सोळा सोमवारची कथा ?' अशा नांवाखालीं त्या लेखकाच्या अभिप्राय लेखनाचें विडंबन केल्याचें पुष्कळांच्या स्मरणांत असेल. त्या विडंबनांत त्यांच्या कल्पकतेचा विलासहि ओतप्रोत भरलेला होता. "ऑयियन नांवाच्या ग्रंथकारानें आपल्या कुकूंबर नांवाच्या ग्रंथांत जें प्रतिपादन केलें आहे तेंच आशिया खंडांतील डेरा इस्माइल खान, डेरा गाझी खान, या सर्वमान्य विद्वान् ग्रंथकारांनाहि पटलेलें आहे." अशा तऱ्हेच्या कल्पनांनीं त्यांनीं तें विडंबन सजविलें होतें; त्याचा परिणाम असा झाला कीं सदर लेखकानें कांहीं दिवसपर्यंत ग्रंथाधाराचें अवडंबर आपल्या लेखणांत शिरूं दिलें नाहीं. त्यांची कल्पनाशक्ति एकदां कार्योन्मुख झाली कीं ती लोकांना आश्चर्यांत लोटण्यासारख्या शीघ्रगतीनें आपलें सिद्धीचें अंतिम स्थान सहज गांठीत असे. त्यांचीं विडंबनें कवित्वाच्या नात्यानें निरंतर ओळखली जातील, याचें कारण त्यामध्यें नुसतीच कल्पनाविकृति नसून अस्सल कवित्व आहे, हें होय.

विडंबनाला विनोदवृत्तीचा भरपूर आधार असावा लागतो. बुवा तर साक्षात् विनोदाचा जणूं काय अवतारच होते ! बुवांनीं जगाच्या काळ्या बाजूचा खूप अनुभव घेतला असतांहि त्यांचें अंतरंग त्यांना प्रसन्न ठेवतां आलें, याचें त्यांच्या स्नेह्यांना नेहमीं नवल वाटत असे. कित्येकांना त्यांच्या विनोदांत कुत्सितपणा असल्याचा भास होत असे; परंतु ज्यांना कुत्सितपणा भासे त्यांना आपल्या कुत्सितपणाचें प्रतिबिंब बुवांच्या विनोदांत पडलें आहे असा बोध झाला नसल्यास त्यांत बुवांचा काय दोष ? बुवांशीं प्रतारणेनें वागणारांना बुवांचा विनोद रुचूं नये, त्यांत कुत्सितपणा आहे, असें वाटावें, हें स्वाभाविक आहे; पण बुवांचा ज्यांना निकट सहवास लाभला, त्यांनाच बुवांच्या निर्हेतुक प्रसन्न विनोदाची साक्ष देतां येईल. विनोदाचा उपभोग घेण्याला निरहंकार, उदार मनोवृत्ती असावी लागते. विनोदाचें साध्य दोषदिग्दर्शन असल्यानें ज्याला आपल्यावरून होणाऱ्या विनोदांत विनोदकाराची हितबुद्धि आहे, असें हृदयांतील अहंकारांच्या गांठीमुळें पटत नसेल त्यांना तो विनोद झोंबावा आणि त्यांनीं बुवांचा द्वेष करावा हेंच उचित आहे. परंतु ज्यांना असा अहंकार नाहीं, त्यांनीं बुवांच्या विनोदापासून धडा घेऊन विनोदाचा विषय झालेला दोष सोडल्याचीं उदाहरणें आहेत. कोणाकोणाला शब्दामागें 'प्र' 'सु' असे उपसर्ग जोडण्याची संवय असते. अशा एका मित्राच्या डोळ्यांत अंजन पडण्याकरितां बुवांनीं एकदां 'आपण प्रेषिलेल्या प्रसूनांच्या प्रचंड प्रहाराच्या प्रदीर्घ प्रवासानें प्रांगणांत प्रपतन झालें.' अशा थाटाचें एक वाक्य रचून भेटीच्या वेळीं त्याच्या कानावर घातलें. या वाक्यामुळें तो मित्र उमजला व आपल्या बोलण्यांतील ढंग घालविण्याचा अभ्यास करूं लागला. बुवांची तारीफ ही कीं, अशा तऱ्हेच्या विनोदासाठीं त्यांना आयास मुळींच पडत नसत. अतिशय सहजपणानें ते विनोद करून जात. कित्येकदां त्यांचीं विनोदी वाक्यें सुभाषिताप्रमाणें साधून त्यांच्या स्नेही मंडळींत चिरस्मरणीय झालेलीं आहेत. बुवांनीं स्वतःच्या काव्यांतील कल्पनांचीं विडंबनें लिहिली आहेत, हा मुद्दा ध्यानांत धरल्यास त्यांच्या निर्मळ वृत्तीची अटकळ झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

बुवांची विनोदपर आणि विडंबनात्मक कविता बाजूस ठेवून त्यांच्या इतर कवितांचा विचार केल्यास तिच्यांत साधेपणा व प्रेमळपणा हे दोन गुण उत्कटतेनें आढळून येतात. बुवांनीं जुन्या संत-कविंच्या प्रासादिक वाङ्मयाचें अध्ययन आणि वाचन निष्ठेच्या एकाग्रतेनें विपुल केलें असल्यामुळें त्यांच्या हृदयांत सात्विक प्रेमाची उचंबळ सहज होऊन त्याला अनुरूप असे अत्यंत साधे पण तसेच अर्थपूर्ण शब्द त्यांना चटकन् सुचत असत. ते आपल्या लहरीनें काव्यगायन करूं लागले कीं दुसऱ्याचें मन चटकन् वेधून घेत. त्यांचीं कांहीं काव्यें इतकीं हृदयंगम वठलीं आहेत कीं, महाराष्ट्रांतले अनेक विख्यात कवि फार आदरानें त्यांचा उल्लेख व प्रसंगोपात गायन करतांना दृष्टीस पडतात. परंतु लोकांना आपल्याविषयीं आदर वाटतो, या माहितीनें बुवांची गुणग्राहकता कधींहि ऱ्हास पावली नाहीं. त्यांच्या गुणग्राही स्वभावामुळेंच त्यांना दृढ प्रेमाचा फार मोठा मित्रपरिवार निर्माण करतां आला. बुवांचे स्वभावगुण त्यांच्या साहित्य गुणाहून अतिशय श्रेष्ठ दर्जाचे होते. बुवांनी ज्याला आपला म्हटलें त्याला ते कधींच विसरायचे नाहींत किंवा त्याची उपेक्षा करायचे नाहींत. अशा त्यांच्या स्वभावामुळेंच ते त्यांस योग्यप्रकारें ओळखणाऱ्या प्रत्येकास हवेहवेसे वाटत. बुवा, प्रपंचाचा बाह्यात्कार विचारांत घेतल्यास अगदीं विसंगत होते. पण त्यांच्या हृदयाच्या ओलाव्याकडे पहातां ते 'बहिस्त्यागी अंतःसंगी' अशा कोटींतील गणावे लागतील.

दर दहा मैलांवर भाषा बदलते असा भाषाशास्त्रांतील सर्वमान्य सिद्धांत आहे. महाराष्ट्र प्रदेश या सिद्धांताला अपवाद नाहीं. भिन्न भिन्न ठिकाणीं मराठी भाषा वेगळ्याच रूपांत आढळते. पण बाह्यांग थोडेंसें बदललें तरी अंतरंग कसें बदलणार ! त्यामुळें गोमंतकापासून तो नागपूरपर्यंतच्या प्रदेशांतील मराठी भाषेचे हे नमूने म्हणजे मराठी भाषेनें धारण केलेले नवे प्रादेशिक अलंकार—

## भाषा मराठीच

### दालदी भाषा—

'एक फकीर साई होते. त्याचे चार सोकरे होते. त्याची बायको आपल्या घोवाला बोलते, "तुमी घरांत बसून-रेल्यांव, धंदारोजगार नाय. तवां हीं लेकरां खातील पितील काय ?" तवां तो बायकोला बोलते, "बीबी, आजचे दीस सबुर करा आनि सव्वाचार रोटी मला भुजून द्या, म्हनजे मी धंद्याला जान." आतां बायकोनी सुबेची आपल्या घोवाला चार रोटी भुजून दिलान. त्यों रोट्यो तो घोव घेऊन जंगलच्या तरफ रवाना झैलो. तो मुख्या कोकस्थानांत गेलो. त्याला दिसा बारा वाजन्याच्या सुमाराला एक बाव नजर पडली. त्या बावीवर बैठून सोबनच्यो चार रोट्यो सोडून बावीच्या चार कोनावर ठेवलान आनि बोलवे लागलो, "एकक् खांव कीं दोकु खांव." आवऱ्यांत त्या बावितला शेखनागाची धू होती. तवां बापानी धुवेला बोलवे लागलो कीं, "बावीवर एक फकीर भुका येऊन बेठलेलो हाय त्याला काई खावेला दे." धू बोलव्या लागली, "आपल्याजवळ खावेला काय नाय. तवां बाप बोलले, "आपली हांडी हाय ती वरती घेऊन जा, आणि त्या हांडीच्या खलतीं लुबान जाल. म्हनजे त्या हांडींत कायतरी शिजून तयार होईल. तां त्याला खावे देस." त्यापरमान धू वरती येऊन बापानें सांगितल्यापरमान करून फकिराला खाव्या घातलान आनि ती हांडी बी फकिराच्या हवालीं केलान. फकिरानें ती हांडी घेऊन थनशी चालतो झैलो. तो वाट चालतां चालतां एका खापरी चोराच्या गावांत गेलो. रात झैली होती, आनि त्या गावचे सगले लोक चोरीला गेले होते. म्हनून एकाच्या ओटीवर त्यान आपला बिस्तार लावलांन. चोराची बायको घरांत होती. त्या बायकोनी त्या फकिराच्या सोबनची हांडी बगलांन. तिच्या दिलाला लागलां कीं ही हांडी मुटी गुनवान् हाय. आवऱ्यात तिचो घो चोरी करून ऐलो. ती आपल्या घोवाला सांगते, "ह्या फकिराजवल एक हांडी हाय. ती मोठी गुनवान् हाय. म्हनून फकिर निजल्यावर आपल्या घरानची एक हांडी न्ह्या आनि फकिराची हांडी हाय ती आपल्या घरांतला हना." त्या परमाने तेच्या घोवान केलान. बायकोनी ती हांडी चुलीवर ठेविल्याबरोबर त्यांत आखनी बिरयानी शिजली. ती दोघा घो बायलानी बैठून खाल्ये. तिनवरती बायको आपल्या घोवाला बोलव्या लागली, "तुमला आतां चोरी करव्या जान्याची काय जरूर नाय. आपल्याला आतां पोटभर खोव्याला मिळाय."



## वंचना

काय म्या पामरें
मागणें मागावें
आणिक फसावें हातोहात.

द्यायचें द्या देवा
माझा न उजर
नफ्याचा वेव्हार कोणाचाहि.

फसविणें जरी
ऐसें फसवावें
चातुर्याचे गावें गुण मींहि.

—मधुकर केचे



*तिला वाटलं—*

*आकाशाचं निळं पाणी आणि चांदण्याचं सोनेरी*
*पाणी यांच्या संगमावर संथपणें तरंगणाऱ्या*
*चंद्राच्या होडींत बसावं आणि आठवणींची*
*पाखरं दूर दूर भिरकावून यावींत*

---

गाडी एक वळण घेते. सतीशचा हलणारा रुमाल दिसेनासा होतो तशी मी डोकें आंत घेते. तूं डायजेस्ट घेऊन बर्थवर गेला आहेस, राणी तिच्या बाहुलीला मांडीवर घेऊन झोंपवते आहे—खरें म्हणजे ती स्वतःच पेंगुळली आहे पण तिची बाहुली झोपल्याशिवाय ती तरी कशी झोपणार !

बॅगवरच्या छोट्या पिशवींत एक गुलाबाचें पानासकट फूल कोमेजते आहे–अगदीं टॅक्सींत चढतांना माईच्या मंगलेनं कुंडींतून तोडून आणलें—गडबडींत तिनेंच पिशवींत टाकलें आणि म्हणाली,

" राणीला दे–तिच्या लाल रिबनवर लाल फूल. "

राणीच्या डोक्यांत तें फूल घालतां घालतां मी मनाशी म्हणते—किती केलं तरी निघतांना गडबडच होते–ताई येते–माई येते—खूप गप्पा होतात–तरी वाटतें कांहींतरी बोलायचें राहून जाणार आहे–विसरणार आहे. आजही तसेंच होते. सतीश बाहेरच्या खोलींत माझें वेडिंग बांधत असतो. आंतल्या खोलींत आई मला खूप कायकाय सांगत "असते—" राणीला संभाळ—तिला आतां पाय फुटलेत–दाराला लाकडी अडकण करून घे—गच्चींतल्या जिन्याला जप—गुरगुट भात घालत जा—आळस करूं नकोस. " मी तोंडानें नुसते 'हो हो' म्हणत असते पण सकाळीं उठल्यापासून मन कांहीं थाऱ्यावर नसते—अगदीं पहिल्या खेपेला सासरीं जातांनाही आईनें असेंच खूप पढवले होते. म्हणाली होती,

" फार हंसत जाऊं नकोस—तुला मुळींच हंसू आंवरत नाहीं—कुणाला आवडते—कुणाला आवडत नाहीं. आपण आपलें अदबीनें वागावें. " पण सासरीं तात्याकाका इतकें हंसवायचे कीं आईनें सांगितलेलें सगळें मी पार विसरलें. लग्नाच्या दिवशीं घरीं आल्यावर त्यांनीं सगळ्या बायकांना उखाणे घ्यायला लावले. सासुबाईंना म्हणाले, " मी सांगतो तोच उखाणा तुम्ही घेतला पाहिजे—" उखाणा काय तर, " बागांत बाग – राणीचा बाग + + + राव दिसतात दांतपडके वाघ. " आणि भान विसरून मी जी हंसत सुटले...नवीननवीन आपण फिरायला जायचे—तेव्हां तेला म्हणायचे

# पांखरें

सौ. अंजलि ठकार

" काय लेका, आतां पोरींना करमत नसेल—लकीच्या कट्टयावर तूं नसतोस " आणि डोळे मिचकावून हंसायचे राणीला प्रथम सासरीं घेऊन आले तेव्हां मला म्हणाले, " बघूं दे हो तुमची टवळी " आणि लगेच तिरप्या डोळयानं तुझ्या मावशीकडे पहात म्हणाले, " बरी आहे—खपवायला कांहीं त्रास नाहीं व्हायचा—नाही कां ग बायको. "

त्यांच्या विनोदाची तुम्हांला आतां इतकी संवय झालीय कीं तुमच्या कुणाच्या चेहेऱ्यावरची सुरकुतीसुद्धां हालत नाहीं पण मी मात्र ते घरांत शिरतांच पदोपदीं हंसू लागते.

तेवढ्यांत ताईचे यजमान येतात. मी अधीरेपणानें विचारते,

" हें काय—ताई नाहीं आली ? "

गंभीरपणानें घड्याळाकडे पाहून तें म्हणतात,

" येईलच एवढ्यांत—म्हणजे रडण्याच्या कार्यक्रमापर्यंत नक्कीच येईल. " आणि तुम्ही दोघे टाळ्या देऊन हंसता.

तूं म्हणतोस,

" या बायका रडतात त्याचें कांहीं नाहीं—पण हा सतीशसुद्धां स्टेशनवर रुमाल काढतो हे अगदी अनाकलनीय आहे बुवा. "

" हा सतीश ना ? "—सदऱ्याला शेंबूड पुसतांना पासून ताईच्या यजमानांनीं सतीशला पाहिलं आहे. " अहो—बायको माहेरून येतांना रडायला लागली तर हासुद्धां तिच्याबरोबर रुमाल काढील." आणि हंसण्याची आणखी एक लाट फुटते.

अगदी निघायची वेळ येते तेवढ्या गर्दींत मी तुला वांकून नमस्कार करायची खूण करते. तूं नाखुषीनें उठतोस. या असल्या पद्धती तुला आवडत नाहींत—पण मला वाटतें बापूंना असें वाटूं नये कीं धाकटा जांवई शिष्ट आहे—तसें कदाचित् त्यांना वाटणारही नाहीं ! पण आमच्याकडे अशी पद्धत आहे. ताईमाईंचे यजमानसुद्धां अजून असा वांकून नमस्कार करतात. बापू मला हातानें उठवीत म्हणतात,

" उगी वेटा, आतां लवकरच येणार आहेस—सतीशच्या लग्नाला. सगळ्या जांवयांनीं उचलून धरलें पाहिजे—मी थकलों आतां " आणि मला आणखीनच हुंदके येतात. धाकट्या लेकीचेही मूल पाहिले म्हणून आई-बापूंना सार्थक वाटते—पण ही निरवानिरवीची भाषा ऐकली कीं माझ्या पोटांत कालवते. तेवढ्यांत आई लगबगीनें येऊन तुझ्या हातावर दह्याची कवडी घालते—टॅक्सींत चढतां चढतां घड्याळाकडे पहात तूं सतीशला म्हणतोस, या हातावर दही न दह्याच्या गडबडींत गाडी चुकायची लेका एखादेवेळीं. फुटला बसतां बसतां सतीश हंसायचें म्हणून हंसतो.

अगदीं गाडी सुटायच्यावेळीं मीं राणीला खिडकींतून आंत घेते—सर्वांनी पपी घेऊन घेऊन तिचे गाल नुसते लालबुंद झालेले असतात. राणीला माझ्या हातांत देतां देतां आई म्हणते,

" आतां आमाला कशा करमेल ले बबल्या, " आणि पुन्हां तिला हुंदका येतो. सतीश म्हणतो,

" यावेळीं फारच थोडी राहिलीस—आतां चांगली महिन्याची रजा काढून ये. " मी नुसतं तुझ्याकडे पाहून हंसते. आणि म्हणते, " कितीही राहिलें तरी अरे पुरतच नाहीं—" गाडी सुटतां सुटतां आई म्हणते !

" हें बघ—तिन्हीसांजा राणीची दृष्ट काढून टाकत जा—आणि तिला उगीच फार नटवीत जाऊं नकोस. " पूर्वीं दृष्ट काढण्यावरून मीं आईची—ताई-माईची टिंगल करीत असे. पण राणी जन्मली आणि हळुहळु माझाही या सर्वांवर विश्वास बसूं लागला.

एकदां कॉलेजातनं येतांयेतां तूं कोडी जांभळे आणली होतीस—' जांभळे पहाताच मी रुमालावर झडप घातली—सासुबाई सहज म्हणाल्या,

" गर्भारपणीं जांभळे खाल्ली तर पोराचे ओठ काळे होतात. " मी तश्शी मागं फिरले—एकाही जांभळाला हात नाहीं लावला. तूं खूप हंसलास. सासुबाईसुद्धां हंसून म्हणाल्या.

" अग तसे एखादे खाल्ले तर चालते हो—"

पण मी म्हटले, " नकोच—कशाला. "

ताई म्हणायची, " ताक, सरबत पी रोज—म्हणजे पोरगा माझ्या सुहाससारखा गोरा गोरा होईल. "

तूं मला चिडवून म्हणायचास,

" पण मी म्हणतो, पोरगा काळा झाला म्हणून काय बिघडेल ? "

पण मी खरेंच नियमानें ताक प्यायची. पोळी कुस्करून खाल्ली कीं तुम्ही दोघं बहिणभाऊ मला फार चिडवायचें. म्हणायचे, " केव्हा एकदां खडा. "

पण गोड अक्कलकोटी हेल काढून सासुबाई म्हणायच्या,

" जेवा कीं उगीच पानाकडे पाहून—खाईनाका तिला हवं तसं—कुस्करून खाल्ले कीं दूध येतय् पोराला भरपूर. "

पण इतकें करून राणीला बाटलीचीच संवय करावी लागली.

आमची आई म्हणायची,

" हल्ली पोरींचें प्रेमच नसते लेकरांवर—सगळे आधींच समजते—कशाकशाचीच नवलाई नाहीं उरली त्यांना. " आई असेंच बोलते पोटांत दुखायला लागल्याबरोबर मी दवाखान्यांत जायचा हट्ट धरला. पण तिचे आपले शांतपणानें सगळे चालले होते—शेवटी सतीश टॅक्सी आणायला गेला—पण टॅक्सी मिळाली नाहीं म्हणून वेळेवर तो टांगाच घेऊन आला. मी खूप चिडले—वाटले पाय आपटावेत—पण तशी ती वेळ नव्हती.

आई म्हणाली, " टांगा तर टांगा–कांहीं तरी वाहन तर आहे ना–आमच्यावेळीं नव्हते असले सत्रा चाव माहित आम्हांला. "

मला वाटले तोंड झाकून घ्यावे––कळ दावीत मी कळवळून म्हटले, " सगळे लोक बघताहेत. "

आई हंसून म्हणाली, " अग बघेनात कां—कौतुकानंच बघतात सारीं. "

मला वाटतं म्हणावं, " डोंबल नि डोस्कं–आईला सगळ्यांत कौतुक वाटतं. "

पण आतां राणी जों जों मोठी होतीय तों तों कौतुक म्हणजे काय ते पुरतं कळतेय. दवाखान्यांत गेल्यावर अर्धा तास झाला तरी डॉक्टरीण बाईंचा पत्ताच नव्हता. मी सारखा डॉक्टरीणबाईंना बोलवा म्हणून धोशा लावला होता—शेवटी तिथली एक करडी नर्स चिडून म्हणाली, " प्रत्येक वेळीं एवढ्या आधीपासून बाई येऊन बसल्या म्हणजे जन्मभर त्यांना जागरणच करावे लागेल. "

आई समजावीत म्हणाली, " येतील हो थोड्यावेळानें—तूं जरा स्वस्थ पड. "

मी चिडून म्हणाले, " मी मेल्यावरच आतां त्या येतील. "

तरी आई आपली हंसतच होती—

ताई म्हणाली, " आई होणं सोपं नसतं बाईसाहेब, अजून तर कांहींच नाहीं—पुढेंच सगळे आहे—मूल वाढवायचं—मोठं करायचं—त्याचे हट्ट मोडायचे "—आणि मी भीतीनें आणिकच अर्धमेली झाले.

ताईला किती अनुभव आहे. मी तसल्या वेळींही ताईकडे आदरानें पाहिलें. राणीला बाटलीची संवय ताईनेंच लावली.—बाटलीची आठवण येऊन मला खुद्कन् हंसू येतें—या मिरगुटलीला लहानपणापासूनच चवीन् ढवी फार,—बूचाला लागलेला मधमध चाटून घ्यायची आणि पुन्हां आपली जोरजोरांत रडायची. अगदीं सासरीं जाण्याची वेळ आली आणि माझा जीव अगदीं रडकुंडीला आला. वाटायचे आपल्याला हिचं सगळे कसें करतां येईल ?

न्यायला येतो म्हणून तुझें पत्र आलें आणि रात्रीं मी आईला म्हटले,

" मी आज राणीची टाळू भरते ग—आणि उद्यां तिला मीच न्हायला घालीन. " आई हंसू दाबीत माझ्याकडे पाहूं लागली. इतकें दिवस ती मागें लागायची तेव्हां मी उडवून लावीत असे—मी म्हणायची,

" मला येईल सगळें आपोआप. "

पण मग गाडींत बसेपर्यंत मी विचारत होते, " पोट दुखलें कीं काय द्यायचं ग ?—हिरडा कीं वेहेडा––आणि खोकल्याला काय, "

बापू हंसून म्हणायचे,

" तूं इथें मारे पाठ कर—तिकडे गेलीस कीं तिचा बाप एक सायरपची बाटली आणून पाजील तिला. "

आई म्हणायची, " वेडी आहे बाई, दिलेलं ज्ञान आणि बांधलेली शिदोरी किती दिवस पुरेल—शेजारींपाजारीं गोड बोलावं—विचारावं —म्हणजे सगळं समजतं—आम्ही काय जन्मभर पुरणार आहोंत ?"

" आम्ही काय जन्मभर पुरणार आहोंत " हें वाक्य सारखं कानांत घुमतय—ओळखीचं वाटतय्––हं—सासुबाईही असेच म्हणतात—तूं जायचा असलास कीं अजून नाना स्टेशनवर पोंचवायला जातात. खरं म्हणजे त्यांना वेळ नसतो—पण जिवाची तडतड करून जातात. दुपारीं तीनला गाडी असली तर सकाळपासून त्यांची गडबड सुरू होते—लवकर लवकर जेवून चांगलें तासभर आधीं स्टेशनवर गेले म्हणजे त्यांच्या जीवांतजीव येतो. तूं हंसतोस–– सासुबाई म्हणतात.

" तुम्ही कशाला जातां—आतां पोरांना सगळें समजतं––गाडी चुकली म्हणून तो कांहीं तुमच्यासारखा दाताशींदात लावून नाहीं बसायचा—आणि आपण काय जन्मभर पुरणार आहोंत ? " पण इतकें झालें तरी नाना धांवत पळत येतातच.

राणीला प्रथमच घेऊन मी सासरी आले तेव्हां गाडी एक तास लेट झाली–माझा जीव तीळतीळ तुटूं लागला––अस्वस्थ होऊन मी म्हणाले, " नाना केव्हांचे येऊन बसले असतील स्टेशनवर. " तूं नुसते हंसलास––तूं नेहमी असेंच खवचट हंसतोस––माझी टिंगल करतोस.

किती आठवणी...

झोपेंतून उठवून राणीला दूध पाजले कीं नाना फार रागवायचे. एकदां अशीच बाटली घेऊन मी राणीजवळ आले नाना रागावले. मी म्हटले, " पण नाना, डॉक्टरीणबाईंच सांगतात कीं मूल झोपले तरी उठवून अडीच तासानें दूध पाजायचंच ! ! "

नाना म्हणाले, " मूर्ख आहेत तुझ्या डॉक्टरीणबाई. "

मी मुकाट्यानें बाटली पुन्हां कपाटांत नेऊन ठेवली, सासुबाईंनीं ओझरते माझ्याकडे पाहिले––त्यांना वाटलें—" हिला हे पटलें कीं नाहीं—कीं रागवली ? "

पण त्यांना काय माहीत—मला वाटत होते हे नाना बोलतच नाहींत – बापूच बोलताहेत.

अरे बापरे—गाडी किती पुढें चाललीय—डोंगर गेले—झाडी संपली—आतां नुसते सपाट मैदान आहे—लांबच्या लांब—अजगरा सारखें...पुन्हां वाटतेय––आतां मात्र मी फार लांब आले—आणि पुन्हां दाटून येतें. तूं हातपाय लांब करून आळस देत खाली येतोस–तेवढ्यांत गाडींतून खालीं उतरायचें म्हणून राणी ओरडूं लागते. तूं तिला एकदम दटावतोस—स्टेशन आल्यावर उतरायचें म्हणून सांगतोस. पण ती आणिकच किंचाळूं लागते. तूं आणखी एकदां

( पान ४१ वर चालू )

---

## चोरटें प्रेम

• • • फुंकर घालून दिवा विझविण्यांत आला आहे, श्वास रोधून धरला आहे, बोलणें कुजबुजत चाललें आहे, ओंठांच्या सुरक्षिततेसाठीं शंभर शपथा घालण्यांत आल्या आहेत; असें चोरटें रत फार सुख देतें.

— गाथासप्तशती ४·३३




*सुभाषबाबूंनीं अजरामर केलेलें हें सिंगापूर— आज येथें मुसलमानांचीं बहुसंख्य वस्ती असली तरीं एकेकाळीं हिंदुसंस्कृती या भागांत अधिराज्य करीत होती—*

# ‘ शोनान ’च्या परिसरांत

—अनंत काणेकर

लहान लहान रस्त्यावरून जातांना चिनी लोकांच्या कपडे वाळत घालण्याच्या पद्धतीची मोठी गंमत वाटली. सबंध रस्त्यांत वरच्या मजल्यावरच्या रहिवाशांनी आम्ही येणार म्हणून आमच्या स्वागतासाठीं दोन्ही बाजूंना आपापल्या खिडक्यांतून गुढ्या, तोरणें उभारलीं आहेत कीं काय असें मला वाटलें. मात्र या गुढ्या पितांबरांच्या किंवा जरीच्या कापडाच्या नसून जुनाट पोलकीं, चड्ड्या, झगे, पायजम्यांच्या होत्या ! खिडकींतून लांब दांड्या बाहेर काढून बांधून ठेवायच्या आणि त्यांच्यावर कपडे वाळत घालायचे, अशी गोरगरीब, मध्यमवर्गीय सिंगापुरांतल्या चिन्यांची पद्धत दिसते. चिनी मोठे डोक्याचे खरे. सिंगापुरांत रोज संध्याकाळीं पाऊस येतो; तेव्हां पाऊस आला रे आला कीं एकदम दांडी आंत ओढून घेतां येते. प्रथमच पहाणाराला रस्त्यावरलें तें दृश्य मात्र कसेसेंच दिसतें.

दुपारचे बारा साडेबारा वाजले तसे सोनाळकरांना त्यांच्या ऑफिसांतून घेऊन गुडमन् रोडवरील त्यांच्या ‘ युकोहाऊस ’ बंगल्याकडे जेवायला जायला आम्ही निघालों. वाटेंत सिंगापुराचा कलांग विमानतळ लागला. विशेष गंमतीची गोष्ट म्हणजे एक विमान तळावर उतरत होतें; त्यामुळें रेल्वेलाईन ओलांडतानां केव्हां केव्हां फाटक बंद असल्यामुळें जसें थांबावें लागतें त्याप्रमाणें रस्त्यावरलें फाटक बंद असल्यामुळें आमच्या मोटारीला थांबावें लागले ! मोटारचा रस्ता विमान तळाच्या मधून जातो.

आज रात्रीं सिंगापुरांत बॅडमिन्टनचे आंतरराष्ट्रीय सामने आहेत. नंदू नाटेकर, रवीन्द्र डोंगरे, हेमाडी, मनोज गुहा, त्रिलोक शेट वगैरे भारतीय खेळाडूंचा संघ त्या करतां मुद्दाम इथें आला आहे आणि अमेरिकन संघाशीं आज रात्रींच त्यांचे सिंगल्स, डबल्स सामने आहेत. आमचे मराठे गडी—नाटेकर, डोंगरे ताक न मिळाल्यामुळें बेचैन आहेत. तेव्हां सोनाळकरांचा मुलगा रेफ्रिजरेटरमधलें ताक एका मोठ्या थर्मासमध्यें घेऊन त्यांच्या हॉटेलकडे जायला निघाला. जेवायला थोडा वेळ होता, तेव्हां आम्हीही त्याच्याबरोबर मोटारींतून बाहेर पडलों. इथल्या सुप्रसिद्ध ‘ ओशन पार्क ’ हॉटेलमध्यें हे खेळाडू उतरले आहेत. आम्ही तिथें पोहोचलों तेव्हां त्यांच्यापैकीं कुणीच हॉटेलांत नव्हता. हॉटेलच्या हिरवळीवरून समोर पाहतां दूर अंतरावर निळसर डोंगर, हिरवी गार झाडी आणि फिकट हिरवा समुद्र असें चित्रांतल्यासारखे दृश्य दिसतें. हॉटेलच्या नोकराजवळ ताकाचें भांडें देऊन आम्ही परतलों. पाहूं या आज रात्रीं ‘ कोकाकोला ’वर ‘ ताक ’ मात करतें का !

मलायाची दाट जंगलें फार विख्यात आहेत. अतिशय उष्ण हवा आणि बारा महिने पाऊस त्यामुळें इथल्या जंगलांतल्या झाडांची भलतीच वाढ होते. इथल्या जंगलांतलीं झाडें प्रचंड, पानें प्रचंड, प्राणीहि प्रचंड—ताडामाडासारखे लांबरुंद अजगर, हात हात लांब सरडे इथें दिसतात म्हणे. या जंगलांचा थोडासा नमुना पहावा म्हणून जेवण आटोपल्याबरोबर सिंगापुरांतल्या ‘ बोटॅनिकल गार्डन्स ’ पहायला बाहेर पडलों. मुंबईच्या राणीच्या बागेसारखीच ही बाग खूप मोठी आहे. निरनिराळ्या प्रकारचीं मोठमोठीं झाडें इथें आहेत, पण फुलें आणि पांखरें फारशीं दिसत नाहींत. पिनांगमध्यें पाहिलें होतें तसलें सुरूसारखें उंच आणि मधल्या सोटाला परकर नेसवावा अशी मोठमोठ्या पानांची परडी असलेलें चमत्कारिक झाड इथेंहि होतें. त्याचें इंग्रजी नांव ‘ स्टॅगहॉर्न फर्न ’ म्हणजे सांबरशिंगी नेचा असें दिलें होतें. मधल्या त्या परडीसारख्या दिसणाऱ्या भागाचीं पानें खरोखरच सांबरशिंगाच्या आकाराची आठवण करून देत होती. झाडाच्या शेंड्याकडली पानें गळून या परडींत पडतात आणि त्यांच्यांतला रस शोषून या परडींतून खालीं झिळमिळ्यांसारखीं लोंबणारी हीं सांबरशिंगीं पानें जगतात, असें कळलें. आणखीं एक मजेदार झाड पाहिलें. याचीं पानें मोठ्या थोरल्या अळूच्या पानांसारखीं हिरवीगार रुंद होतीं. पांचदहा पानांत एखादें पान गुलाबी किंवा पांढऱ्या रंगाचें, आणि त्या मध्यांतून विष्णूच्या नाभींतून कमळाचा देठ फुटावा त्याप्रमाणें एक तांबडेंलाल बोटासारखें बोंड वर आलेलें. हें बोंड फुटलेलें निराळ्या रंगाचें पान या झाडाचें फूल असावें ! याचनेला कुणीतरी हात पुढें करावा आणि त्या हाताच्या तळव्यांतून लाल किंवा गुलाबी मेणबत्ती वर आलेली असावी असें कांहीं तरी हें फूल पाहिल्यावर वाटतें. युरोपियनांचें, विशेषतः अमेरिकनांचें ‘ ऑर्किड् ’ हें फार आवडतें फूल आहे. निरनिराळ्या रंगाची ‘ ऑर्किड् ’ फुलें असतात. या चमत्कारिक आकाराच्या फुलाला माथेरानमहाबळेश्वरांतले माळी ‘ विंचूचें फूल ’ म्हणतात. तसाच कांहींतरी त्याच्या पाकळ्यांचा वेडावाकडा पण सुंदर आकार असतो. इथें पाहिलेलीं मलायी ‘ आर्किड् ’ फुलें खूपच मोठीं आणि जांभळट, गुलाबी रंगाचीं होतीं.

‘ बोटॅनिकल गार्डन्स ’ मधून इथलें ‘ रॅफल्स












म्यूझियम हे वस्तुसंग्रहालय पाह्यला गेलों. जावा सुमात्रा, मलाया या भागांतले बहुतेक सर्व लोक आज मुसलमानधर्माचे असले तरी हजार बाराशें वर्षांपूर्वी इथें हिंदु सम्राटांचें अधिराज्य होतें. जनतेचा धर्म हिंदु होता. जावाजवळच्या बालीबेटांत तर अजूनहि हिंदु आहेत. इथल्या ऐतिहासिक अवशेषांत हिंदु संस्कृतीची छाप आढळतेच, पण आजच्या मलायी भाषेंत, स्त्रीपुरुषांच्या नांवांत, कथानाटकांतहि ती आढळते. जावा सुमात्रांत कातरलेल्या चित्रांवर प्रकाश पाडून पडद्यावर दाखवण्यांत येणारें 'छाया नाट्य' फार लोकप्रिय आहे. या नाट्यांतलीं व्यंगचित्रांसारखीं दिसणारीं चित्रें आणि कांहीं मुखवटे एका काचेच्या कपाटांत होते. या लाल, सोनेरी, काळ्या, पिवळ्या मुखवट्याखालीं सुग्रीव, घटोत्कच, जनक, कुंभकर्ण, वृकोदर अशीं नांवें होतीं. मात्र जनक हा शब्द डच स्पेलिंगाप्रमाणें 'Djanoko' असा लिहिला होता. या 'छाया नाट्यां'च्या कथा अजूनहि महाभारत रामायणांतल्याच असतात. छायानाट्यासाठीं वापरल्या जाणाऱ्या असल्याच चित्रांचा एक संच इंडोनेशियाचे अध्यक्ष डॉ. सुकर्ण यांनीं कांहीं दिवसांपूर्वी पंडित जवाहरलालांना नजर केल्याचें कांहीं दिवसांपूर्वी वृत्तपत्रांत वाचलें होतें.

एका दालनांत मलायांतल्या सुलतानांच्या दरबारांतल्या भरजरी गाद्या, तक्के, लोड होते. त्यांना 'बंतल सराया' म्हणतात. बोर्निओ विभागांत सुरेख रंगीत कशीदा काढलेले झाडाच्या सालीचें कापड होतें. एकीकडे बालीबेटावरल्या 'अर्जुन विवाह' नाटकांत वापरायचे भयंकर दिसणारे रंगीबेरंगी मुखवटे दिसले. १९१० सालीं सुमात्रांत सांपडलेला तेवीस फूट लांबीचा अजगर भुसा भरून एके ठिकाणीं ठेवला होता. दुसरीकडे खेळांतल्या होडीसारखी एक छोटीशी रंगीत होडी होती. खेड्यांत कसली साथ आली म्हणजे मलायी खेडुत ही होडी समुद्रांत सोडून देतात. तिच्यांतून सर्व इडापिडा जाते म्हणतात. तिथें नांव लिहिलें होतें, 'कपालहान्त्' वस्तुसंग्रहालयाच्या इमारतीचा जिना चढून वर गेल्यावर पहिल्या मजल्याच्या प्रवेशद्वाराशींच एक छोटासा काळ्या रंगाचा अर्धपुतळा आहे. जावा बेटावरल्या पौराणिक गोष्टीतल्या अर्जुनाचा तो पुतळा आहे. त्याच्या समोरच कुणा तरी चिनी नटाचा असाचा एक अर्ध पुतळा दिसला.

या सिंगापूरांत तीन चतुर्थांशापेक्षां अधिक लोक चिनी आहेत; पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे या वस्तु संग्रहालयांत ऐतिहासिक, सांस्कृतिक अवशेष पहायला आलेल्या शेंकडों स्त्रीपुरुषांत मला एकहि चिनी पुरुष किंवा स्त्री दिसली नाहीं. मुलांबाळांसह तिथें आलेले सर्व स्त्रीपुरुष मलायी होते. बारीक डोळ्यांचें बसकट चेहेऱ्यांचे मलायी पुरुष काळ्या किंवा हिरव्या मखमलीच्या वर दुमडलेल्या 'सुकर्ण' छाप टोप्या डोक्यावर, गुलाबी रंगाचा रेशमी सदरा आणि पायजमा, पायजम्यावर पंचासारखा रंगीबेरंगी रेशमी 'सेरॉंग' कमरेला बांधलेला



A Satay Man सिंगापूर

अशा थाटांत; तर मलायी बायका रंगीबेरंगी रेशमी सदरा आणि पायजम्यांत होत्या.

परत येतांना समुद्राजवळच्या क्लिफर्ड पियर, एलिझाबेथ वॉक्, अँडर्सन ब्रिज या भागांतून आम्हीं आलों. समुद्रकांठीं एका टोंकाला एक चिनी पद्धतीचा देवळासमोरच्या दीपमालेसारखा दिसणारा स्मारकस्तंभ दिसला. या ठिकाणीं सुभाषबाबूंचें स्मारक होतें म्हणतात. ब्रिटिशांनीं जपान्यांकडून पुन्हां सिंगापूर घेतल्यानंतर तें स्मारक काढून टाकून त्यानां या लढाईत सहाय्य करणाऱ्या कुणा तरी चिनी इसमाचें हें स्मारक त्यानीं उभें केलें.

सोनाळकरांनीं रात्रीच्या बॅडमिन्टन सामन्यांचीं आमच्यासाठीं तिकिटें घेऊन ठेवलीं होतीं. आंतरराष्ट्रीय 'टॉमस कप्'साठीं हे सामने होते. सिंगापूर बॅडमिन्टन हॉलमध्यें हे सामने पहायला आम्ही सोनाळकरांबरोबर गेलों. ब्रेबर्न स्टेडियमसारखीच बसायची व्यवस्था होती. पण जागा सर्व बाजूंनी बंद आणि खेळांतले 'शटल, कोक्' किंवा फूल उडूं नये म्हणून पंखेहि बंद, त्यामुळें आंत मनस्वी उकडत होतें. ज्यांच्या नांवें हा 'कप' आहे ते सर टॉमस सामना पाह्यला आले होते. हॉलमध्यें चिनी आणि हिंदी लोकांचीच गर्दी दिसत होती. पहिलाच सामना अमेरिका विरुद्ध भारत असा होता. दोन्ही राष्ट्रांचीं राष्ट्रगीतें बॅन्डवर वाजवण्यांत आलीं, आणि सिंगल्स सामना सुरू झाला. प्रेक्षकांचा उत्साह उतू जात होता. नंदू नाटेकराच्या प्रत्येक फटक्याला टाळ्यांचा गजर होत होता. अमेरिकन खेळाडूचा पराभव करून नंदू नाटेकर विजयी झाला. ताकानें कोका कोलावर मात केली!

## २५ मे १९५५

आपल्याकडे ज्याप्रमाणें 'अमृतांजन' हें नांव सर्वतोमुखी झालेलें आहे त्याच प्रमाणें सिंगापूर आणि मलायांत 'टायगर बाम' झालें आहे. या 'टायगर बाम'चे मालक असलेले दोवे चिनी भाऊ 'ऑबून हॉ' आणि 'ऑबून पार' हें औषध विकून कोट्याधीश झाले आहेत. त्यांची आई ब्रह्मी आणि वडील चिनी. चाळीस वर्षांपूर्वी सायकल वरून औषधें विकीत सिंगापूरच्या रस्त्यावरून ते फिरत असें कळलें. त्यानंतर 'टायगर बाम'चा कारखाना त्यानीं काढला. आणि आज त्यांच्या कारखान्यांत बाराशें स्त्रियां काम करतात. सिंगापुरांतलें एक प्रख्यात इंग्रजी दैनिक आज त्यांच्या मालकीचें आहे. या भावांनीं आपलें स्मारक म्हणून म्हणा किंवा गंमत म्हणून म्हणा, 'हॉ पार व्हिला' किंवा 'टायगर बाम गार्डन्स' नांवाची राणीच्या बागेसारखी एक प्रचंड बाग केली आहे. या बागेंत जिवंत प्राणी नाहींत, सिमेन्टचे रंगीबेरंगी, चित्रविचित्र अजस्र प्राणी आहेत. सकाळीं १० वाजतां बोटीवरून बाहेर पडलों, आणि सोनाळकरांच्या मोटारींतून ही बाग पाह्यला गेलों. या बागेंत जें पाह्यलें तें खरोखरच स्वप्नांत–नव्हे दुःस्वप्नांत पाह्यल्यासारखें वाटलें. रात्रीच्या वेळीं कांहींतरं अबैट-चबैट पोट फुगेपर्यंत खाल्यानंतर झोपेंत केव्हां केव्हां भयंकर स्वप्नें पडतात, आणि जागे

अनुक्रमणिका

झाल्यावर सुद्धां आपली छाती धाडधाड उडत असते. या ' टायगर बाम गार्डन्स ' म्हणजे रंगीबेरंगी सिमेन्टचें एक जिवन्त दुःस्वप्न आहे. चिनी पुराणांतले, दंत कथांतले प्राचीन वाङ्मयांतले भयंकर प्राणी, मासे, खेकडे, अजगर, कासव, शहामृग, राक्षस, राक्षसिणी सर्व कांहीं इथें आहे. ' रक्तकमल मंदिराची जाळपोळ या नांवाची एक प्राचीन चिनी कथा आहे म्हणे. त्या कथेंत मठांतल्या भिक्षूंनी पुष्कळसे स्त्रीपुरुष ठार केल्याचें वर्णन आहे. त्या भिक्षूंना नंतर समुद्राच्या शंखांतून बाहेर आलेल्या जलपऱ्या मारून टाकतात. हा कथाभाग एके ठिकाणीं लाल, पिवळ्या, काळ्या, हिरव्या सिमेन्टांत दाखविला आहे. एके ठिकाणीं नाकांतोंडांतून अग्निज्वाला बाहेर टाकणारे राक्षस आहेत, तर दुसरीकडे मेंढ्याच्या गळ्यांत सर्प लोंबतो आहे आणि त्याला पहात वाघ उभा आहे. कुठें कासवाएवढे मोठे गुलाबी खेकडे, लाल, हिरवे, काळे शिवड मासे, काळे सील, पांढरे अस्वल अकारण एकमेकांजवळ आहेत, तर कुठें शहामृगाच्या पाठीवर एक प्रचंड कासव वर मान करून ऐटींत बसला आहे. एके ठिकाणीं एक मोठी थोरली डुकरीण आडवी पडली आहे. तिचे अनेक स्तन माकड, जिराफ, हरीण वगैरे प्राणी पिताहेत, आणि तिची पिल्लें आशाळभूतपणें पहात आहेत ! हिरव्या, लाल, पिवळ्या रंगाच्या सिमेंटाच्या एका पुष्करिणींत एका बाजूला एक प्रचंड बेडूक दुसऱ्या बेडकाला तोंडांत धरून गिळण्याचा प्रयत्न करीत असलेला दिसतो, तर दुसऱ्या बाजूला एक हिरवा साप दुसऱ्या सापाला मटकावतो आहे. आजूबाजूला उंदीर बसले आहेत. या पुष्करिणीच्यामध्यें दीपमाळेसारखा एक स्तंभ आहे, आणि त्या स्तंभावर बुद्धाची मूर्ति आहे. एके ठिकाणीं एक चिनी तरुणी एका म्हातारीला आपला स्तन देते आहे, आणि तिची मुलें तिच्या पुढ्यांत उभी आहेत ! या सर्व अद्भुत-कथानक पसाऱ्यांत अधूनमधून चाफ्याचीं, कण्हेरीचीं, गुल्मोहोराची ओळखीची झाडें,—सिमेंटाची नव्हे खरीखुरीं,—दिसत तेव्हां जरा हायसें वाटे.

ही बाग पाहून पासार पंजांग जालन रस्त्यानें परत जात असतां डोक्यावरून एक रूपेरी रंगाचा पूल आडवा गेलेला दिसला. हा पूल नव्हता. ' टायगर बाम ' च्या मालकांचाच नांगर छाप बीअरचा प्रचंड पांढऱ्या रंगाचा कारखाना रस्त्याच्या एका बाजूला आहे. इथें तयार झालेली बीअर रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला असलेल्या इमारतींत बाटल्यांत भरण्याकरतां ज्या अजस्र पांढऱ्या नळांतून पलीकडे जाते ते नळ आम्हांला पुलासारखे वाटले होते ! सिंगापूरच्या श्रीमंत लोकांचे बंगले या टँगलिंग भागांत आहेत. ' टायगर गार्डन्स ' चें एक मालक ऑ बून हॉ यांचा एक बंगला इथें आहे. या बंगल्यांत मौल्यवान ' जेड ' दगडांच्या वस्तूंचा फार मोठा संग्रह त्यांच्या खासगी मालकीचा आहे. परवानगी घेऊन तो कुणालाही पहातां येतो. जातां जातां तो पहाण्याचें ठरवून आम्ही बंगल्याच्या आवारांत गेलों. बागेंतल्या रस्त्याच्या



' ट्रॅव्हलर्स पाम ' सिंगापूर

दोन्हीं बाजूंना पांढऱ्या दगडाच्या बुद्धाच्या मूर्ती होत्या. प्रवेश द्वाराशीं लांबलचक सोटा हातीं असलेला एक धिप्पाड भय्या उभा होता. आम्हांला आंत जायचें आहे, तेव्हां परवानगी कुठें घ्यायची म्हणून आम्हीं त्याला विचारलें, तेव्हां आमचे रंगरूप न्याहाळींत तो उत्तम हिंदींत हंसत हंसत म्हणाला, ' साहेब तुम्ही तर मांझ्या देशांतले, तुम्हाला कसली परवानगी ? मी आहे ना तुम्हाला आंत न्यायला. मी उत्तर हिंदुस्थानांतल्या गोरखपूरचा आहे, साहेब, चला आंत." हिंदुस्थानांतले लोक दिसल्यामुळें त्याला फार आनंद झालेला दिसला. बागेंत बंगल्यांत पूर्ण शांतता होती, पण चिनी संगीताचे मंद स्वर कुठल्यातरी रेडिओवरून येत होते.

' इथं कुणी रहातं कीं काय ? ' आम्ही त्या भय्याला विचारलें.

' हो आमच्या जुन्या धन्याच्या चार बायकां-पैकीं एक इथें रहाते, ' तो म्हणाला, ' दुसरी हॉंगकॉंगमध्यें रहाते. आमचे धनी ओवून-हो साहेब अडुसष्ट वर्षांचे होऊन चारपांच वर्षां-पूर्वींच वारले. त्यांचे बंधू ' ओवून पार साहेबहि वारले. '

' त्यांचे मुलगे मुली असतीलच,' आम्ही विचारलें.

' आहेत ना ' तो म्हणाला;- पण ते मजा करताहेत. आज सिंगापुरांत तर उद्यां हॉंग-कॉंगला, परवां रंगूनला नाहींतर डाकार्ताला असे ते फिरत असतात. '

तो बोलत असतां मी बागेंतल्या फुलझाडां-कडे पहात होतो. हिरवळीवर कुठें कुठें मला हरणें दिसलीं. तीं मातीचीं होती. खऱ्या प्राण्यांपेक्षां मातीचे किंवा सिमेन्टचे प्राणी करून ते बागेंत ठेवण्याचा या चिनी लोकांना षोक दिसतो !

ऑ बून हॉची विधवा बंगल्यांतल्या एका भागांत रहात असली तरी जेडच्या वस्तू अस-लेला बंगल्याचा भाग लोकांकरतां खुला आहे. जेडच्या वस्तूप्रमाणेंच साऱ्या जगांत विख्यात असलेलीं कित्येक शतकांपूर्वींची इतिहासकालां-तली नक्षीकाम केलेली प्रचंड चिनी भांडींही या बंगल्यांत आहेत. चिंग अमदानींतलीं, मिंग अमदानींतलीं, युंग अमदानींतलीं हीं भांडीं उत्कृष्ट कलाकृती म्हणून कलासृष्टींत ओळखलीं जातात, आणि यूरोप अमेरिकेंतले शोकी श्रीमंत हजारो रुपये ओतून असले एक एक भांडें खरेदी करतात. प्रवेशद्वाराशींच असलेलीं असलीं दोन भांडीं जवळ जवळ माझ्याइतकीं उंच होतीं ! लख्ख कांचांच्या कपाटांत ठेवलेल्या जेडच्या वस्तू एकाहून एक सुंदर होत्या. त्यांना पाहून ' टायगर गार्डन्स ' मधल्या भयंकर आकृति ठेवण्याचे शंभर गुन्हे

( पान ३९ वर पहा )

एका 'अफलातून औरत'ची
रोमहर्षक सत्यकथा

# पु त ळी

—२३ जानेवारी १९५८ रोजीं मध्यभारतांतील एका खेड्यात पोलिसांशीं झालेल्या झटापटींत दरोडेखोरांच्या टोळीची ख्यातनाम नायिका पुतळी ही ठार झाली—आणि एका साहसी जीवनाचा अंत झाला !

—मध्यभारतांतील अनेक खेड्यांतून कालांतरानें पुतळीची अद्‌भुतरम्य नवलकथा मोठ्या आवडीनें वारंवार सांगितली जाईल. पुतळीचं साहस आणि क्रौर्य सारखंच अमानुष होतं. स्त्रीत्वाला लाज आणील अशी काळीकुट्ट भयानक कृत्यें तिच्या हातून घडलीं.

—पण मृत्यूनंतरहि तिच्या चेहऱ्यावरचं स्मितहास्य लोपलं नाहीं. जणूं कृतकर्मांचा ना खेद ना खंत !

—अशा असामान्य स्त्रीची ही शोककजनक कहाणी !

लेखक : **चंद्रसेन**

मध्यभारतांतील अनेक खेड्यांतून पुतळीची ही कहाणी मोठ्या आवडीनें सांगितली जाईल. आणखी कांहीं दिवसांनी तर तिच्यावर गाणीं आणि लावण्या रचल्या जातील. पुतळीचं क्रौर्य अमानुष होतं. स्त्रीत्वाला लाज आणील असे असंख्य खून तिच्या हातून घडले. पण या सर्वांचा तिच्या मृत्युमुळें विसर पडेल. दरोडेखोरांच्या एका टोळीची प्रमुख लुटारू ललना म्हणून कालांतरानें तिची ही भयानक कृत्यें कदाचित मोठ्या कौतुकानें वर्णिली जातील.

पुतळी ही एका वेश्येची मुलगी. तिचं बालपण म्हणण्यासारखं रोमांचकारी नव्हतंच. तरुण वयांत पदार्पण केल्यावर साहाजिकच तिनें आईचा पेशा पत्करला. पुतळीला कांहीं अलौकिक रुपमति असं विशेषण बहाल करण्याजोगी रुपसंपदा तिच्यापाशीं नव्हतीच. सडपातळ, अजाण चेहेरा, पण तिचं खरं वैशिष्ट्य तिच्या सफाईदार नृत्यांत. तिचा आवाजहि अति कर्णमधुर होता. विशेषतः ठुमऱ्या म्हणण्यांतील तिचं कौशल्य अनुपमेय होतं.

पुतळीच्या या नाचगाण्याची ख्याति साऱ्या मध्यभारतांत हां हां म्हणता पसरली. तिचा फड खेडोपाडी तर फारच लोकप्रिय झाला. वयाच्या २२ व्या वर्षीं म्हणजे १९५१ सालीं धोलपूर संस्थानांत एका खेड्यांत तिच्या नाचाचा कार्यक्रम ऐन रंगांत आलेला असतांना त्याच भागांतील सुलतानसिंग गुजर या कुविख्यात दरोडेखोरानें तिला पळविली. यापूर्वी सुलताननें तिचे चारदोन नाचगाण्याचे कार्यक्रम पाहिलेले असल्यामुळें सुलतान अक्षरशः तिच्यावर फिदा झाला होता.

पळवून नेल्यानंतर पुतळीनें खूप आदळआपट, अकांड तांडव केलें पण शेवटीं ती सुलतानला शरण गेली. इतकीं तीहि त्याच्यावर बेहद्द फिदा झाली. सुलतान हा दरोडेखोर दिसायला देखणा आणि पूर्वी भारतीय सैन्यांत होता. त्यानें आणि मानसिंगनें मध्यभारतांत चिकार धुमाकुळ माजवला होता आणि त्याला पकडून देणाऱ्याला मोठें बक्षिस जाहीर करण्यांत आलें होतें. पुतळीनें सुलतान सिंगकडे जेमतेम सहा महिने काढले. सुलतानच्या धांवपळीच्या दरोडेखोरी जीवनाशीं जुळतें घेणं तिला सुरवातीला कठिण गेलं. त्यामुळें एक दिवस ती पळून आपल्या आईकडे आली. पण आईकडचं जीवनहि तिला रुचेना. पण आतां उघड उघड सुलतानकडे परत कसं जायचं ? शेवटीं वाखाई नांवाच्या खेड्यांत तिनं आपला नाचाचा कार्यक्रम ठरविला. त्याच खेड्यांत सुलतानची टोळी आली होती. हा योगायोग साधून पुतळी परत सुलतानकडे आली.

आतां पुतळीचें भटकें जीवन सुरू झालें. पण तिचं मन द्विधा झालं होतं. एकीकडे उनाड आणि चटकदार आयुष्यक्रमाची आवड तर दुसरीकडे शांत आणि सुस्थिर जीवनक्रम कंठण्याची मनीषा. शेवटीं तिच्या मनांतील दुष्ट प्रवृत्तीचा विजय झाला. गर्दीचं धांवपळीचं, पळवापळवीचं खून माराामाऱ्याचं असं रोमांचकारी आयुष्य तिनं पत्करलं.

या काळांत मध्यभारतांत मानसिंग आणि सुलतान यांच्या दरोड्यामुळं मध्यभारतांतील जनता हैराण झाली होती. यामुळें पोलिसांनी त्यांना पकडण्याचा चंग बांधला, पहारे वाढवले त्यांच्या हालचालींची सूक्ष्म नोंद ठेवली. आणि त्याचा योग्य परिणाम होऊन आग्रा पोलिसानीं धोलपूर संस्थानांतील राजाई या खेड्यांत १९५३ मध्यें सुलतानच्या टोळीवर छापा घातला. पोलिसांची आणि दरोडेखोरांचीं भयंकर जोराची चकमक झाली आणि दरोडेखोरांना पळ काढावा लागला. यांत पुतळी मात्र पोलिसांच्या हातीं सांपडली. पुतळीच्या या सहजासहजींच्या शरणागतीमुळें टोळीच्या हालचालींची बातमी तिनेंच पोलिसांना दिली कीं काय असा संशय टोळीवाल्यांच्या मनांत निर्माण झाला.

पुतळीला कैदेंत ठेवण्यांत आलें पण २६-५-१९५३ रोजीं तिची जामिनावर सुटका करण्यांत आली. पुतळीची अवस्था मोठी चमत्कारिक झाली होती. गुन्हेगारीचा आरोप सिद्ध झाला तर आपलें स्वातंत्र्य संपुष्टांत येणार याची तिला जाणीव होती. पण आईच्या घरीं जाणं किंवा तुरुंगांत खितपत पडणं या दोन्हीं गोष्टी तिला मंजूर नव्हत्या. जीवनांत अद्‌भुतरम्य नाट्य तिला हवं होतं. इतिहासाची गाणीं गाण्यापेक्षां इतिहास घडविण्याचा तिला ध्यास लागला होता. दोन महिन्याच्या आंतच तिनें सुलतानच्या टोळीची एका विवक्षित ठिकाणीं गांठ घेतली. त्याला कायमचें सामील होण्याचा मनोदय तिनें जाहीर केला.

पण सुलताननें तिच्या पुनरागमनाबाबत फारसा उत्साह दर्शविला नाहीं. वातावरण संशयानें गढूळ झालें होतें. तिनें पोलिसांच्या

अनुक्रमणिका



वतीनें आपल्याला जाळ्यांत पकडण्यासाठीं हा व्यूह रचला असावा अशी त्याच्या मनांत शंका निर्माण झाली होती. आपल्याला पदरांत घे अशी तिनें सुलतानची मोठ्या काकुळतीनें विनवणी केली. त्याला मोहांत पाडण्यासाठीं आपल्या सौंदर्याचाहि उपयोग केला आणि तुझ्याशीं आमरण एकनिष्ठ राहीन अशी ग्वाही दिली. सुलतानचें तिच्यावर अंतःकरणपूर्वक प्रेम असल्यामुळें त्यानें तिला आश्रय दिला आणि याउपर ती पुनरपि पळून जाऊं नये म्हणून तिला दरोडेखोरीची दीक्षा देण्याचा निर्धार केला. पुतळीचें शास्त्रोक्त शिक्षण सुरू झालें. त्यानें तिला सर्व शस्त्रांच्या वापराचें शिक्षण दिलें आणि दरोड्याच्या कामगिरींत भाग घेण्याची तिच्यावर सक्ति केली. लवकरच आपण एक अप्रतिम शिष्या आहोंत हें पुतळीनें सिद्ध केलें. सुलतानच्या टोळींतील कुणाहि दरोडेखोरापेक्षां पुतळीची हिंमत आणि साहस जबर होतें. वाटेल ते हाल सहन करण्याची तिची ताकद आणि सहनशक्ति अवर्णनीय होती. रानावनांतून रात्रीं वेरात्रीं हिंडतांना जिनें तहानभुकेचीहि कधींच पर्वा केली नाहीं. थोड्याच काळांत सुलतानच्या टोळीची ती एक मोठी आधारस्तंभ बनली. अखेर तिनें गुन्हेगार आयुष्यक्रमाचा कायमचा स्वीकार केला.

या काळांत मध्यभारतमधील गुंडगिरीला आणि दरोडेखोरीला अतोनात उत आला होता. सर्वत्र भयावह वातावरण निर्माण झालें होतें. या सर्व परिस्थितीवर नियंत्रण ठेवणें अगत्याचे झालें, म्हणून १९५५ मध्यें उत्तरप्रदेश, राजस्थान, विंध्यप्रदेश आणि मध्यभारत या चार राज्यसरकारांनीं संयुक्तपणें ही ही गुंडविरोधी आघाडी लढण्याचा निश्चय केला. एकूण ८००० चौरस मैलांचा विस्तृत प्रदेश मानसिंग आणि इतर दरोडेखोरांनीं व्यापिला होता. एक स्वतंत्र सशस्त्र दलहि या भागासाठीं उभारण्यांत आलें. जंगलाजंगलांतून वावरणाऱ्या दरोडेखोरांच्या हालचालीची बातमी लागावी म्हणून बिनतारी संदेशाचें क्षेत्र वाढविण्यांत आलें. पोलीस आणि दरोडेखोर यांच्या वारंवार चकमकी घडूं लागल्या. पोलिसांच्या या कारवायांच्या खेडूतांच्या मनावर चांगला परिणाम होऊन त्यांतील बरेच जण दरोडेखोरांच्या हालचालीची बातमी देण्यास पुढे सरसावले. बातम्यांच्या जोरावर पोलिसांना १९५५ च्या मे च्या पहिल्या आठवड्यांत निश्चित कळलें कीं मोरीना जिल्ह्याच्या अर्जुनपुरा आणि चंपक खेड्यांच्या आसपास सुलतानसिंग आणि लाखणसिंग यांच्या टोळ्या वावरत आहेत. दोन सशस्त्र पोलीस दलें तातडतोब पाठविण्यांत आलीं. हीं पोलीस दलें दुपारी १२ वाजतां ससकापुरा या खेड्यापाशीं आली आणि तेथें त्यांची दरोडेखोरांशीं गांठ पडली. दरोडेखोरहि सशस्त्र होते. चकमक मोठी नाट्यपूर्ण झाली. या चकमकींत सुलतानसिंग आणि त्याचा उजवा हात मातादिन हे दोघे ठार झाले. मात्र या गडबडींत बाबू लोहारी या दरोडेखोरांच्या मदतीनें पुतळी मात्र पोलिसांच्या तडाक्यांतून निसटली.

याच काळांत काकानपुरा या खेड्यांत सुमारे तीन महिन्याच्या आंतच पोलिसांच्या बरोबर झालेल्या चकमकींत मानसिंग ठार झाला. मानसिंगच्या मृत्युमुळें दरोडेखोर हवालदिल झाले.

पुतळीचा प्रियकर नाहींसा झाला होता. दरोडेखोरांच्या वारंवार होणाऱ्या पराभवांमुळें ती हतबल झाली. टोळीची तर फाटाफूट झाली



अनुक्रमणिका

होती. नवे मित्र आणि नवी संघटना तयार करण्याचें अवघड काम होतें. सुलतानच्या मृत्यू-नंतर बाबू लोहारीनें टोळीचें नेतृत्व पत्करलें आणि पुनरपि मध्यभारतांत धमाल उडवून दिली. बाबू लोहारीनेंच पुतळीला पोलीसांच्या तडाक्यांतून बाचवलें होतें. त्यामुळें आपली कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं पुतळी बाबू लोहारीची राख म्हणून राहिली. आतां पुतळीबाबतच्या संशयाचे सर्वस्वी निराकरण झालें होतें. आपल्या सौंदर्यानें आणि लालित्या-मुळें तिनें दरोडेखोरांचें प्रेम आणि विश्वास संपादन केला होता. यापुढें तिची अखेरी त्यांच्याबरोबरच व्हायची यांत त्यांच्याहि मनांत संशय नव्हता.

दरोड्याचें सत्र चालूंच होते. आणि पोलिसहीं स्वस्थ बसलेले नव्हते. त्यांनी पुतळीच्या टोळीचा पाठलाग चालूच ठेवला होता. २ सप्टेंबर १९५५ ला मोरीना जिल्ह्यांतील विसेंथा या गांवी पोलीसांनी पुतळीच्या टोळीला गांठलें. जोराची गोळा-गोळी झाली. दरोडेखोर निसटले, पण पोलिसांच्या हातीं बराच मोठा ऐवज आणि मुद्देमाल सांपडला.

४ सप्टेंबरला दरोडेखोरांनीं रुपेहटी या खेड्यावर दरोडा घालून तेथील चार खेडूतांना त्यांनीच पोलिसांना बातमी पुरविली या संशयानें ठार मारलें. पण यामुळें पोलिसांना त्यांच्या हालचालीचा मार्ग काढणें सुलभ झालें. ५ सप्टेंबरला मौखेडा या गांवी पोलिसांची आणि दरोडेखोरांची जंगी चकमक झाली. यांत शेवटीं नाईलाज म्हणून दरोडे-खोरांनीं पळ काढला पण या गडबडींत बाबू लोहारी हा मात्र ठार झाला.

बाबू लोहारीच्या मृत्युमुळें पुतळी परत उघडी पडली. शिवाय पोलिस मागावर होतेच. त्यामुळें या खेड्यांतून त्या खेड्यांत, त्या खेड्यांतून या खेड्यांत असा लपंडाव करीत ती रुपा नांवाच्या दरोडेखोराला भेटली. आपल्या टोळींत एखादी बाई सामील करून घेणं हें धोक्याचं आहे हें जाणून असल्यामुळें रुपानें पुतळीला आपल्या टोळींत घेण्यास नकार दिला. पुतळी निराश झाली. तिचं अंतःकरण दुःखित झालं. कुणालाच ती नको होती.

आपल्या जुन्या कर्तृत्वामुळें कुणी सहज आपल्याला टोळींत सामील करून घेईल अशी तिला आशा होती. तिनें अनेक टोळीवाल्यांना गांठलें आणि सर्वांनीं तिला साभार नकार दिला. शेवटीं नव्यानेंच एका टोळीचा पुढारी झालेल्या कल्ला या नांवाच्या एका दरोडे-खोरानें तिचा आदर केला. त्याच्या टोळींत ती एक प्रमुख भागीदार म्हणून सामील झाली. थोड्याच काळांत पुतळीनें आपल्या लालित्यपूर्ण सौजन्यानें सर्वांची मनें जिंकली. यामुळें तिची आज्ञा पाळायला सर्वजण एका पायावर तयार राहूं लागले.

पुतळीनें दरोडेखोरींत मोठ्या आत्मीयतेनें भाग घेतला. प्रत्येक दरोड्यांत तिनें लुटालूट पळवापळव आणि खून करण्यास मागे पुढें पाहिलें नाहीं. कल्लानें दरोडा घातला कीं त्याठिकाणीं स्त्रियांची वासलात लावण्याची कामगिरी पुतळीकडे असे. पण स्त्रियांना पुतळी इतक्या क्रौर्यानें वागवी कीं तिच्या नांवाची सर्वांनीं दहशतच घेतली. पुतळीच्या साथीदारांना त्याचे कौतुकच वाटें आणि प्रत्येक दरोड्याच्या वेळीं ते पुतळी की जय असा पुकारा करीत.

गुन्ह्याची संख्या वाढूं लागलीं. हिवाळ्यांत दरोडेखोरीला ऊत येई. उभ्या पिकांचा आश्रय घेऊन ते पोलिसांना सहजासहजीं हुलकावण्या देत. त्यामुळें पोलिसांनीं या गुन्ह्यांना कायमचा आळा घालण्याचें ठरविलें. दरोडेखोरांचा बंदोबस्त करण्यांत प्रवीण असलेल्या पोलीस अधिकाऱ्यांनीं परिस्थितीची बारकाईने पाहाणी आणि छाननी केली. पण कल्ला हा मोठा हुशार दरोडेखोर होता. तो शक्यतेवढा पोलिसांशीं होणारा मुकाबला टाळीत असे. शिवाय स्वतःची गुजर जमात ज्या भागांत आधिक्यानें राहत असे अशा भागांतच तो हालचाल करी. त्यामुळें त्याचे लोक पोलिसांच्या हालचालीची बातमी त्याला आगाऊ देत. पुतळीबाबत तर विशेष खबरदारी घेण्यांत येई. वेळप्रसंग पडल्यास ते तिला आपल्या घरांत आश्रय देत. त्यामुळें पुतळीला पकडणें तर अधिकच कठीण झालें होतें.

पण १४ फेब्रुवारी १९५६ रोजीं पोलिसांनीं कल्लाच्या टोळीला गांठलेंच. मोठी भयानक चकमक उडाली. दुर्दैवानें या चकमकीत पुतळीच्या डाव्या दंडाच्या खालीं पोलिसाची गोंळी घुसली. भयंकर रक्तस्राव होत असतां-नाहि तें असह्य दुःख सहन करून पुतळीनें तेथून पळ काढला. तिची अवस्था इतकी विकट होती कीं तिला तात्काळ वैद्यकीय मदत आवश्यक होती. जवळच्या एका गांवा-तील डॉक्टरनें तिचा हात कापून काढला, एक हात कायमचा तुटला तरी पुत-ळीची युयुत्सु वृत्ति नाहींशी झाली नाहीं.

दोन महिन्यांनीं आजारांतून बरी होतांच तिनें पुनरपि आपल्या गुन्हेगारी आयुष्याला सुरवात केली.

२७ मार्च १९५७ ला पोलिसांना अशी बातमी लागली कीं खिरोली गांवच्या जंगलांत कल्ला आणि पुतळीची टोळी एक रात्र काढ-णार आहे. ही बातमीं कळतांच पोलिसांच्या चार पलटणीं त्या गांवाला वेढा घालण्यासाठीं रात्रौ पाठविण्यांत आल्या. भाजेकर नांवाचे पोलिस अधिकारी गांवांतील घराघरांतून असा तपास करीत असतांना एका घरांतून सटासट गोळ्या झाडण्यांत आल्या आणि भाजेकर जागच्याजागीं गतप्राण झाले, लागलीच सशस्त्र पोलिस त्या ठिकाणीं आले आणि दोन्ही बाजूं-कडून गोळ्यांचा भडिमार सुरूं झाला. पण रात्रींची वेळ साधून दरोडेखोर तेथून निसटलेच.

१४ डिसेंबर १९५७ रोजीं पुतळीच्या टोळीनें मोरीना जिल्यांतील कुलहोली गांवी ४० हजार रुपयांच्या मालमत्तेवर दरोडा घातला. याच महिन्यांत आणखी एका खेड्यावर दरोडा घालून या टोळीनें ३५ हजार रुपयांची चीजवस्तु लुटली. त्यामुळें नॉर्दन रेंजच्या सर्व वरिष्ठ पोलिस अधिकाऱ्यांनी एकत्र येऊन १९ डिसेंबर १९५७ ला या टोळीचा बंदोबस्त करण्याचा एक आराखडा तयार केला. या आराखड्याप्रमाणें या टोळीला कसेंहि करून जंगलांतून उघड्या मैदानावर यायला लावायचें, तसेंच त्यांना पोर्सा आणि नागरा विभागांत हुसकावित न्यायचें, आणि तेथेंच त्यांना वेढा घालून त्यांचा नाश कराव-याचा. त्याप्रमाणें नागराभागांत आठ सशस्त्र तुकड्या ठेवण्यांत आल्या व जागता पाहारा ठेवण्यासाठीं घोडेस्वारांची एक तुकडी जय्यत ठेवण्यांत आली.

पोलिसांच्या या आक्रमक धोरणामुळें पुतळीच्या टोळीला जंगलाबाहेर पडण्याखेरीज गत्यंतरच उरलें नाहीं. दरोडेखोर लपतछपत आड्व्या तिड्व्या मार्गानें जोरा सुमावली



अनुक्रमणिका

नूरबाद, मार्गे कोयार या खेड्यांत आले, त्याचवेळीं पोलिसांना बातमी मिळाली कीं कोयारमध्यें लाखणसिंग हा दरोडेखोर आलेला आहे. पोलिसांनीं तात्काळ एक व्यूह रचला. निरनिराळ्या पोलिस अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली वेगवेगळ्या तुकड्यानी एक कडें केलें. पण रात्रौ या भागांतून लाखणसिंगाची टोळी पसार झाली आणि बेसावधपणें कल्ला पुतळीची टोळी आयतीच पोलिसांच्या तावडींत सांपडली २३ जानेवारी १९५८ रोजीं सकाळीं नऊ वाजतां पोलिसांनीं जवळ जवळ यायला सुरवात केली. आणि ९॥ वाजतां त्यांना कल्ला पुतळीची टोळी दिसली. पोलिसांना पाहतांच दरोडेखोर सावध झाले आणि बचावाचें साधन म्हणून त्यांनी प्रथम फैरी झाडल्या. पुतळीनें तर हे आव्हान स्वीकारलें तरमुसा खेड्यांत त्यांचा एक दरोडेखोर घायाळ झाला. टोळीनें नदीकडे पळ काढला. कल्लानें आपल्या टोळीचे दोन भाग केले. आपण पांच माणसें घेतली आणि पुतळीकडे ९ माणसें दिली. गोळ्यांच्या वर्षावांतच त्यानीं पळायला सुरात केली. पण त्याठिकाणीं उघड्या मैदानांत वर्तुळाकार चारी बाजूनें पोलीसांच्या गोळ्यांचा वर्षाव आणि कुठेंच आडोसा नाहीं. आपण आतां अक्षरशः मृत्युच्या खाईत आहोंत हें दरोडेखोरांना कळून चुकलें. समोर एक पडकी भिंत होती पण हाय ! तिथेंहि पोलिस होतेच. त्यामुळें एकामागून एक दरोडेखोर ठार झाला. पुतळीने पळून जाण्याचा प्रयत्न केला पण एका निंबाच्या झाडाखालीं ती ठार झाली. मात्र या धमालींत कल्ला मात्र निसटला.

सुमारें ३॥ तास म्हणजे दुपारीं २ वाजेपर्यंत ही चकमक चालू होती. पुतळीसकट एकूण दहा दरोडेखोरांची प्रेतें हातीं लागलीं शिवाय कपडे, दारुगोळा, दागदागिने, रोकड पैसा आणि किरकोळ एक हजार रुपये किंमतीच्या चीजवस्तु पोलिसांच्या हातीं लागल्या. या भडिमारांत दोन पोलिस घायाळ झाले.

पुतळीच्या टोळीनें पळवून आणलेला तिलकसिंग नांवाचा एक चौदा वर्षांचा मुलगा सांपडला. या मुलानें दिलेल्या माहितीवरून दरोडेखोर दिवसा जंगलांत रहात व रात्रौ कामगिरीवर बाहेर पडत. त्यांना खेडूत जेवण आणून देत. मात्र त्यावेळीं या पोराचे डोळे बांधण्यांत येत. त्यानें असेहि सांगितलें कीं पुतळीला टोळीवाले फारच मान देत. फक्त तिलाच परदेशी दारू प्यायला मिळे. उत्तम जेवण आणि उत्तम सौंदर्यप्रसाधनें तिच्यासाठीं असत. तिच्या पिशवींत साबण, पावडर, लिपस्टिक, नेल पॉलीश, केसांचें सुगंधी तेल या वस्तु सांपडल्या. ती खाकी पँट व बुशशर्ट वापरीत असे. पुतळी दरोडेखोरांची नर्स आणि डॉक्टर होती. तिच्या पिशवींत अनेक औषधें आणि इंजेक्शनचें साहित्य मिळालें.

अशा तऱ्हेनें एका शूर पण वाट चुकलेल्या स्त्रीचा अंत झाला ! एकूण ५५ दरोड्यांत आणि ३५ खुनांत तिचें अंग होतें. मध्यभारतांतील निदान १०० घरें तरी तिनें लुटली. या चकमकीनंतर तिचें शव मोरीना येथें नेण्यात आलें हजारों लोक तिला पाहाण्यासाठीं आले होते. तिच्या चेहऱ्यावर स्मितहास्य होतें. जणूं झाल्या घटनेचा अगर आपल्या आयुष्यक्रमाचा तिला ना खेद ना खंत ! एकूण २९ वर्षांचा तिचा जीवनक्रम—पण किती अद्भुतरम्य होता.. किती विलक्षण आणि किती साहसपूर्ण ! !

• • •

( पान ३५ वरून चालू )

ऑबून बंधूंना एकदम माफ करून टाकावेसे वाटले ! लालसर, गुलाबी, हिरवट, काळसर, मांजराच्या डोळ्यासारख्या अनेक छटांच्या जेड दगडाच्या लहानमोठ्या मूर्ती, पेट्या, पक्षी, प्राणी तिथें होते. ताजमहालमध्यें कबरे भोंवती संगमरवरी दगडाच्या जाळ्या आहेत, तशा सुंदर कोरीवकामाच्या जेड दगडाच्या जाळ्याहि इथें दिसल्या. एका कपाटावर सोन्याची बुद्धाची मूर्ति होती आणि तिच्या दोन्ही बाजूंना सोन्याचें काम केलेलीं दोन चिनी भांडीं होतीं. काळ्या कुळकुळीत शिसवी लाकडाच्या ठोकळ्यांत बसवलेले दोन मोठे थोरले हत्तीचे दांत एकाकोपऱ्यांत होते. गोरखपुरी भय्यानें मोठ्या अभिमानानें आम्हाला सांगितलें, ' साहेब, हे हस्तिदंत आपल्या हिंदुस्थानांतल्या हत्तींचे आमच्या यू. पी. तून मालकांनी इथें आणले ! '

पांढरट गुलाबी अलाबास्टर दगडाचा ग्रीक स्त्रीचा एक अतिशय सुंदर पुतळा एका खोलींत होता, तर दुसऱ्या एका खोलींत तांबड्या रंगाची एक रेशमीगादी आणि जरतारी काम केलेल्या तांबड्या गाद्यांच्या दोन खुर्च्या होत्या. यां खोलींत ऑबून हॉचा एक भव्य फोटो भिंतीवर होता, आणि त्याच्यासमोर भस्म भरलेल्या चिनी भांड्यांत बुद्धमंदिरांत दिसणाऱ्या बोटाएवढ्या जाड उदबत्त्या जळत होत्या.

आमच्या गोरखपुरी मित्राला धन्यवाद देऊन बोटीवर दुपारचें जेवण घेण्याकरतां आम्ही परतलों.

संध्याकाळीं मलायाचे एक प्रमुख विचारवंत आणि सिंगापुरांतील मलाया विद्यापीठाचे अर्थशास्त्रज्ञ उंगक् अब्दुल अझीझ यांना भेटायला जायचें होतें. माझे मित्र श्री प्रभाकर पाध्ये हे सिंगापुरांत पूर्वींच येऊन गेलेले होते. उंगक् अझीझनां भेटल्याशिवाय राहूं नका असें त्यांनी मला बजावून सांगितलें होतें. त्यांच्यासाठीं पाध्यांनी मला एक पत्रहि दिलें होतें. सोनाळकरांनीं टेलिफोन करून आम्ही संध्याकाळीं त्यांना भेटायला येणार असल्याचें कळविलेंच होतें. सिंगापूरच्या दूर एका टोकाला मुंबईतल्या खंबालाहिल–मलबारहिल्सारख्या रम्य डोंगराळ भागांत ' युनिव्हर्सिटी ऑफ मलाया ' आहे. संध्याकाळीं सहाला आम्ही बाहेर पडलों. या बाजूला जातांना सुखवस्तू लोक रहात असलेल्या एकाहून एक सुरेख इमारती वाटेंत दिसत होत्या. अँग्लो-चायनीज् हायस्कूलची इमारत तर आमच्या इथल्या विद्यापीठांच्या इमारतीपेक्षां भव्य वाटली. हायस्कूलला केवढें तरी प्रशस्त पटांगण आणि उंच घड्याळघर किंवा क्लॉक-टॉवर आहे. सिंगापुरांतल्या चिन्यांची एकाहून एक मोठी हायस्कूलें आहेत म्हणतात. इथली रहाणी महागाईची आहे, पण पगारहि तसेच आहेत. याच अँग्लो-चायनीज हायस्कूलांत श्री. प्रधान हे एक आपले महाराष्ट्रीय गेलीं कित्येक वर्षें भूगोल वगैरे विषयांचे शिक्षक आहेत. त्यांचा महिन्याचा पगार बाराशें मलायी डॉलर म्हणजे जवळ जवळ अठराशें रुपये आहे ! सिंगापुरांत त्यांचें स्वतःचें घर आणि मोटरहि आहे. गेल्या महायुद्धांत जपान्यांनी सिंगापूर घेतलें तेव्हां प्रधान तिथेंच होते. ब्रिटिश कैद्यांच्या कॅम्पचे प्रमुख किंवा असेंच कांहीं तरी काम जपान्यांनी त्यानां त्यावेळीं दिलें होतें. ( अपूर्ण )




# परमेश्वर आणि मी


• श्री. दि. के. बेडेकर
• सौ. ज्योत्स्ना भोळे
• श्री. बाबुराव बागवे


हजारों वर्षें मानवानें जंग जंग पछाडले. पण या सृष्टीच्या सर्वशक्तिमान नियंत्याच्या अस्तित्वाचें गूढ अजून तरी त्याला उकललेलें नाहीं. थोर भक्तजनांना साक्षात्कार झाल्याचे दाखले आहेत आणि सर्वसामान्यांच्या जीवनांत कधीं कधीं अतर्क्य अशा घटना घडून येतात आणि हें गूढ अधिकच गहन होतें. दीपावलीतर्फे महाराष्ट्रांतील विविध क्षेत्रांत अग्रभागीं चमकणाऱ्या कर्तृत्ववान व्यक्तींपासून तों समाजाच्या खालच्या थरांतील व्यक्तींना या विषयाबाबत एक प्रश्नपत्रिका पाठविण्यांत आली. ही प्रश्नपत्रिका पुढें दिलीच आहे. या उपक्रमाला सर्वांनीं मोठें आपुलकीचें सहकार्य दिलें. या उत्तरपत्रिकांतील निवडक अशा कांहीं पत्रिका दरमहिन्यास आम्हीं वाचकांना सादर करणार आहोंत.

## — आमची प्रश्नपत्रिका —

**१—आपला परमेश्वरावर विश्वास आहे का? असेल तर कां? नसेल तर कां नाहीं?**

**२—आपला धर्मावर विश्वास आहे का? असेल वा नसेल! तर काय म्हणून?**

**३—आपण प्रतिदिनीं पूजा वा प्रार्थना ह्यापैकीं कांहीं नियमितपणें करतां काय? आपण एखाद्या धार्मिक पुस्तकाचें वाचन करतां काय?**

**४—आपणांस दैवी अथवा अतिमानवी, म्हणजे ज्याचें स्पष्टीकरण सर्वसामान्य तर्कान्वयें देतां येत नाहीं, असा कांहीं अनुभव आलेला आहे काय?**

**५—वरील प्रश्नांशिवाय मानव आणि परमेश्वर यांच्या परस्पर संबंधासंबंधीं आणखी कांहीं सांगूं शकाल का?**

## श्री. दि. के. बेडेकर

मराठींतील एक नामवंत टीकाकार. नव्या वाङ्मयाचें साक्षेपी अभ्यासक आणि चोखंदळ रसिक. वृत्तीने मार्क्सवादी असले तरी हाडाचे साहित्यिक.

तुम्ही विचारलेल्या पांच प्रश्नांपैकीं चौथा प्रश्न 'दैवी' अथवा **'अतिमानवी'** अनुभवांबद्दल आहे. तुम्हीच त्याचें वर्णन केलेलें आहे म्हणून उत्तर सोपें झालें आहे व तें मी प्रथम देतो. ज्या अनुभवाचें 'स्पष्टीकरण सर्वसामान्य तर्कान्वयें देतां येत नाहीं' असे अनुभव मला सतत येतात. पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते आणि स्वतःभोंवतीं फिरते म्हणून दिवसरात्र आणि ऋतुमानाचे बदल होतात हा तर्क झाला. पण पहाटेच्या वेळीं आकाश सुंदर दिसतें आणि श्रावणमासांत माणसाचें मन प्रसन्न होतें हा अनुभव तर्कानें समजूं शकत नाहीं. तीच गोष्ट एक



वेगळ्या तऱ्हेच्या अनुभवाची. माणसाला दारिद्र्यामुळें हालअपेष्टा भोगाव्या लागतात हें तर्कानें समजूं शकते, पण दारिद्र्य व दुःख नसावें ह्या भावनेचा अनुभव कां येतो हें सांगणें कठीण आहे. तसेंच साध्या जिज्ञासेबद्दलहि म्हणतां येईल. जगांत प्रत्येक वस्तु पाहिली कीं तिच्याबद्दल कुतूहल वाटणें, तिचें रूप व त्याच्यामागील तिचें 'सत्य' शोधण्याची जिज्ञासा मला इतर सर्वच माणसांप्रमाणें वाटूं लागते. या अनुभवाचें तरी स्पष्टीकरण काय देतां येईल!

सारांश, माझ्या साध्या **नित्याच्या** भल्याबुऱ्या वाटणाऱ्या **अनुभवांपैकीं बहुतेक सारे तर्कातीतच** आहेत. त्यांना तर्काच्या दावणीला बांधण्याची इच्छाहि मला होत नाहीं. आतां ज्याला 'दैवी' किंवा 'अतिमानवी' असे अनुभव मानलें जातें ते या नित्याच्या अनुभवांपेक्षां वेगळे असतात हें खरें. उदाहरणार्थ, मी बसलेल्या खोलींत कोणी माणूस आलेला मला दिसला नाहीं व जमिनीवर पावलांचे ठसे मात्र उमटत गेले. तर असें मनांत येईल कीं कोणी तरी अदृश्य असणारा, किंबहुना शरीर नसणारा, मनुष्य माझ्या खोलींत 'चालत' आला असावा व त्याच्या 'पावलांचे' ते ठसे असावेत. शरीर नाहीं म्हणून तो मला दिसला नाहीं. पण त्याला 'पावलें' असलीं पाहिजेत! असें कांहीं घडलें तर जें तर्कातींत नसतें 'शरीर नाहीं' आणि 'पावलें आहेत' अशा दोन तर्कांतील **परस्पर विरोधानेंच** केवळ समजणारें असतें. 'दैवी' अथवा 'अतिमानवी' घटना अशा तऱ्हेनें समजून घ्यावयाच्या असतात व तशा समजून घेतल्या तरच त्यांना 'चमत्काराचें' दैवी स्वरूप येतें.

अशा 'चमत्कारां' चा मला एकदांहि अनुभव आलेला नाहीं. माझें वय आतां चालू पन्नास वर्षांचें आहे व मी कोठल्याहि चमत्कारिक व नवलाईच्या गोष्टीकडे लहान मुलांच्या चौकस बुद्धीनें पहाणारा आहे. पण मला अशा दैवी अनुभवांचा प्रत्यय कधीं आला नाहीं खरा.







आतां आपण तुमचा दुसरा प्रश्न घेऊं. माझा ' धर्मा ' वर विश्वास आहे कीं नाहीं ? दैवी चमत्काराचा अनुभवच आलेला नसल्यानें **' दैवी ' किंवा ' अतिमानवी ' धर्मावर** माझा विश्वास बसणार कसा ! पण आधीं मी म्हटल्याप्रमाणें मला पहाटेच्या सुंदर आकाशाचा, माणुसकीच्या व सहृदयतेच्या भावनेचा आणि वस्तूंचें रूप समजावून घेण्याच्या जिज्ञासेचा अनुभव आहे व तो सारा अनुभव म्हणजे ' मी ' आहे. यालाच हवें तर माझें आयुष्य म्हणा, कारण ' आयुष्या ' चीं वर्षें अशा अनुभवांनीं ' भरलेली ' नसतीं तर कालगणनेला अर्थच उरला नसता. आतां अशा तऱ्हेचा अनुभव घेत जाणें व त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांनीं व वृत्तींनीं प्रेरित होऊन कांहीं तरी कृति करीत जाणें हा **' मानवी मनाचा धर्म, '** म्हणजे गुण, आहे. या ' धर्मावर ' माझा इतका ' विश्वास ' आहे कीं त्याची जाणीवहि मला नाहीं. कांहींतरी **बाहेरचें व शिकून पत्करलेलें** तत्त्व माणसानें मनांत धरलें तर त्यावर त्यानें ' विश्वास ' ठेवला असें म्हणतां येते; मनुष्य जें न कळत किंवा अभावितपणें व सहज करीत राहतो व मानतो त्याला ' तत्त्व ' म्हणावें का ? आणि त्याच्यावर ' विश्वास ' ठेवण्याचें तरी प्रयोजन असतें का ?

या शेवटच्या माझ्या प्रश्नाचें मीच उत्तर देईन तें असें: पूजा, प्रार्थना किंवा एका ठराविक धार्मिक ग्रंथाचें पठण ह्या गोष्टी माणसानें **पत्करून केलेल्या** असतात, विश्वास ठेऊन मुद्दाम केलेल्या असतात. ज्या सहजतेनें फूल पाहून माणसाचें मनहि फुलतें त्या सहजतेनें तो तें फूल तोडून देवाच्या डोक्यावर वाहतो असें मानणें मला तरी शक्य नाहीं. पूजापठणाच्या गोष्टी कांहीं माणसें ' सहजतेनें ' करतात असें वरवर पाहतां वाटेल पण तें खरें नाहीं. ती सहजता नसून संवय असते, संस्कृतांत बोलायचें तर ' संस्कार ' असतो.

---

( पान ३२ वरून चालू )

जोरांत ओरडतोस, पण मी मध्यें बोलायची सोय नाहीं—नाहीं तर राणी शेफारेल ना !

शेवटी तूं जेव्हां हात उगारतोस तेव्हां हंसू दाबीत मी राणीला म्हणते, " अय्या, अगअग, तुझ्या बाळाला घे लवकल—उतल उतल आलं टेशन—थांऽऽबली गाडी..." आणि मी नुसतं तिला बांकावरून उतरवून बॅगवर बसवते. राणी क्षणांत खुदुखुदु हंसू लागते, हा तुझा भयंकरच अपमान आहे—पण मी सुखावर स्वार होऊन पुढेंच चालले आहे—पुढेंच...

अजगरासारख्या काळाकडे छद्मी हंसून मी सांगतेय्, " तुला काय ठाऊक—हीं सगळीं माणसें—या आठवणी मला जन्मभर पुरणार आहेत—सुख माझ्या पायांशी असंच सारखं गुडघे टेकून बसणार आहे..."

आकाशाचं निळं पाणी आणि चांदण्याचं सोनेरी पाणी यांच्या संगमावर चंद्राची होडी संथ तरंगतेय्—मलाही राणीसारखंच वाटतंय्—हें आंबलेले शरीर चालत्या गाडींतून थेट त्या होडीत झोकून द्यावं—आणि मुठींतली ही आठवणींची पांखरं तिथून दूरदूर उधळून द्यावीत–आईबापूंकडे–नानासासुबाईंकडे...

• • •

माझ्या मनांत अनेक वस्तूंबद्दल, कांहीं वेळां कांहीं माणसांबद्दल किंवा एखाद्या माणसाच्या एखाद्या कृत्याबद्दल पूज्यभाव उत्पन्न होतो. कांहीं प्रसंगीं ' अमूक व्हावें, घडावें ' अशी प्रार्थनेच्या वेळीं उत्पन्न होते तशी भावना माझ्या मनांत उत्पन्न होते. ती उत्कंठा तीव्र असते, पण तिच्यामध्यें अमूक एका शक्तीकडे याचक म्हणून जाण्याची इच्छा नसते. ती उत्कंठा माझी माझ्या मनांतच कल्लोळ करीत राहते, अपेक्षित घडलें तर मन शांत होते व न घडलें तर दुःखी होते. तें दुःख मग कालांतरानेंच कमी होतें.

साध्या सहजपणानें मी तुकारामाचे अभंग किंवा गीतेसारखे धार्मिक ग्रंथ वाचले आहेत. त्यांतून मिळणारा आनंद काव्यवाचनाच्या आनंदासारखा एकदां वाचतांना वाटला. पण अशा ग्रंथाचें किंवा कोठल्याच वाचनीय पुस्तकाचें पठण कां करावें तें मला कधीं उमगलेले नाहीं.

आतां तुमचा पहिला प्रश्न येईल. परमेश्वरावर तरुण वयांत विश्वास नसलेलीं माणसें गधेपंचवीशींतून बाहेर पडून कांहीं वर्षें लोटल्यावर आस्तिक बनतात, असें कांहीं मोठ्या माणसांच्या उदाहरणांवरून दिसतें. पण त्यांच्या **मोठेपणाचें** हें कांहीं गमक मानणें मला जरूर वाटत नाहीं. विवेकानंद नास्तिक असते किंवा गौतमबुद्ध आस्तिक असता तरी त्यामुळें त्यांच्या मोठेपणांत कांहीं उणेपणा आला नसता. तुरुंगांत असतांना मला आस्तिक खुनीहि भेटले आहेत. माझ्यापुरतें सांगायचें तर श्रद्धाळू घरांतल्या मुलाप्रमाणें मी प्रथम आस्तिक होतो. मग स्वतःचीं व इतरांचीं सुखदुःखें कळूं लागलीं. डार्विन, थॉमस हार्डी, तुकाराम, विवेकानंद व आगरकर अशा माणसांचे ग्रंथ वाचून स्वतःच कांहीं विचार ठरवावेसे वाटलें. शेवटीं मी नास्तिक झालो. पुढें, कांहीं वर्षांनीं, मी मार्क्स वाचला, तेव्हां त्याच्यामुळें मी नास्तिक झालो नाहीं. आजमितीला माझीं मतें बदललेलीं नाहींत व बदलतील असें आवतरी दिसत नाहीं.

आतां माझी नास्तिक्याची भूमिका बदलणार नाहीं असें मला कां वाटतें तें सांगतांना ' मानव ' व ' परमेश्वर ' यासंबंधीं पांचव्या प्रश्नांत तुम्ही विचारलेलें ' आणखी कांहीं ' सांगून पुरें करतो. अश्रद्धाळू

[ पान ४३ वर चालू ]

दिवाळी अंकाची (अ) पूर्व तयारी : जुना आणि जाणिता चित्रकार



आम्ही मनपसंत चित्रें ' पाडून ' देऊं.









**गगनीं नक्षत्रें आहेत बहुत ।**
**परि चकोरासी तोषवी रोहिणीकांत ॥**

रसिक आणि चतुर मराठी वाचकाची तृष्णा ही चकोर पक्षासारखीच !
त्याला शरदांतल्या चांदण्यांतलेच कोवळे कोवळे अमृत कण हवे ! !

गेल्या पंधरा वर्षांच्या तपश्चर्येनें **दीपावलीनें** हें ओळखलें आहे.
आणि ‘ एकमेव ’ असा जाणत्यांचा आशीर्वादहि घेतला आहे. म्हणूनच

# दीपावली वार्षिक अंक १९५९

## सहर्ष सादर करीत आहे :—

- **नवरसांचा आविष्कार करणाऱ्या १२ ऑफसेट पद्धतीने छापलेल्या कलाकृति**
- आकर्षक, सुबोध आणि शतरंगी मुखपृष्ठ.
- ज्येष्ठ आणि श्रेष्ठ लेखकांचें ‘ अक्षर ’ वाङ्मय.
- दीपावलीच्या परंपरेला शोभणारी नाविन्यपूर्ण ललित लेखमाला.
- अनेक नवनवीन सदरें, व्यंगचित्रें, त्रिंगचित्रें, हास्यचित्रें वगैरे.
- गेल्यावर्षी ‘ **दीपावली** ’चा दिवाळी अंक (संपल्यामुळें) मिळाला नाहीं म्हणून निराश झालेल्या रसिकानों, इतिहासाची पुनरावृत्ति होऊं नये अशी इच्छा असल्यास रु. १२ वार्षिक वर्गणी भरून आजच वर्गणीदार व्हा व तिप्पट किंमतीचा हा विशेषांक त्याच वर्गणींत दिवाळीपूर्वी घरपोंच मिळवा. दिवाळी अंक र. पो. नें पाहिजे असल्यास रु. १ अधिक पाठवा.
- **हिंदी दीपावली** आपल्या वैशिष्ट्यानें नेहमीप्रमाणें याचबरोबर येत आहे.
- वृत्तपत्र विक्रेत्यानीं माहितीपत्रक मागवावें.

★

**पृष्ठें २००** **किं. ३ रुपये** अधिक र. पो. १ रुपया

**प्रकाशक : दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, कॅनेडी ब्रिज, मुंबई नं. ४.**

अनुक्रमणिका

**नास्तिक** पुढेमागें आस्तिक बनणें शक्य असतें, कारण 'अश्रद्धा' ही मनःस्थिति टिकाऊ नसते आणि अश्रद्धेंतून सुटण्याचा प्रयत्न माणूस करीत राहतो व शेवटीं भोंवतालच्या परंपरेंत नांदणाऱ्या श्रद्धेंत तो विश्रांति घेतो. असें घडण्यांत वाईट कांहीं नाहीं कारण नुसताच अश्रद्ध राहलेला माणूस स्वतःला व इतरांना अपाय करणें जास्त सुलभ असतें. पण माझ्या बाबतींत असें घडलें कीं **नास्तिकपणाच्या अश्रद्धेंतून बाहेर पडून पण नास्तिकच राहून कांहीं श्रद्धा मी आत्मसात करूं शकलो.** त्या श्रद्धांमुळेंच आयुष्यांतल्या नानाविध प्रसंगाचा मी माझ्यापुरता तरी कांहीं अर्थ लावूं शकलो.

पृथ्वीवरील जीवकोटींतील प्राण्यांशीं माणसाचें नातें आहे आणि विकासक्रमामध्यें शरीराची, विशेषतः मेंदूची व मज्जातंतूंच्या संघटनेची, कांहीं विशिष्ट रचना त्याला लाभल्यामुळें माणसाला इतर प्राण्यापेक्षां जास्त प्रगल्भ जिज्ञासा, सौंदर्यासक्ति व नैतिक संयमाची शक्ति लाभलेली आहे, ही माझी प्राथमिक श्रद्धा आहे. हें सारें डार्विननें सांगितलें त्याला शंभर वर्षें झालीं. पण तें श्रद्धास्थान म्हणून मानावयास फार थोडी माणसें आज तयार होतात, कारण माणसाचें नातें 'अतिमानवी' व 'दैवी' अशा परमेश्वराशीं किंवा सृष्टीमध्यें ओतप्रोत अशा चित्‌शक्तीशीं किंवा ब्रह्मवस्तूशीं आहे, ही पारंपरिक भूमिका लोकांना सोडवत नाहीं. मला ती भूमिका सोडून देणें योग्य वाटतें व डार्विनच्या सिद्धान्ताचा आधार माझ्या जीवनाला आणि विचारांना दिलासा वाटतो.

माणसाला एकदां प्राणिकोटींतला मानलें म्हणजे मग पुढच्या श्रद्धा आपोआप रचल्या जातात. माणूस हा प्राणी समूहजीवनहि जगतो व वैयक्तिक सुखदुःखें, विचार, सौंदर्यानुभवहि घेतो. त्याचें समूहजीवन आणि व्यक्तिजीवन सुखानुभवांनीं समृद्ध होण्यासाठीं त्यानें कांहीं विधिनिषेध पाळणें इष्ट ठरतें. त्यालाच आपण माणसाची नीति किंवा मानवोचित आचरणाचें नियम म्हणावें व यांत सत्यनिष्ठा, 'अहिंसात्मक' म्हणजे इतरांना अपायकारक न ठरेल असें आचरण वगैरे सद्‌गुणांचा अंतर्भाव करावा असें मला वाटतें. या सर्व श्रद्धेंत मला फक्त 'औचित्य' ही एकच कसोटी सांगतां येईल. माणसाला सुखप्राप्तीसाठींच अशा औचित्याचा विचार करावा लागतो व म्हणून ती कसोटी मला पुरेशी वाटते. या साऱ्या भूमिकेला 'शहाणा सुखवाद' किंवा असेंच कांहीं नांव देतां येईल व त्याचें खंडन, एकंदर सुखवादाच्या खंडनाप्रमाणेंच करतां येईल. पण येथें मी माझी श्रद्धा सांगत असल्यामुळें खंडनाची दखल घेण्याची मला गरज वाटत नाहीं.

परमेश्वर, ब्रह्म इत्यादि **कल्पनाचें अस्तित्व** मला अमान्य नाहीं, किंबहुना मानवनिर्मित सर्वच गोष्टी मला प्रियहि आहेत, पण त्या **मानवाच्या कल्पनाविश्वांतील घटक** म्हणूनच. त्या कल्पनांच्या दडपणाखालीं राहून मानवजातीनें अनेक सद्‌गुण आचरलें व भीषण अनन्वित कृत्येंहि केलीं. आजमात्र त्या कल्पनांचें दडपण हळूहळू दूर होत आहे व हें योग्यच आहे. आपल्या आचरणांत जो माणसाला संयम व शहाणपणा हवा तो ईश्वराच्या दयेनें किंवा भीतीनें उत्पन्न होणार नाहीं, म्हणून या कल्पनांचें दडपण लवकर नाहीसें व्हावें असें मी म्हणेन. माणसाला स्वतःच्या **प्राणित्वाची** व **मर्यादांची** जसजशी **जाणीव** वाढत जाईल तसतशी त्याची 'आध्यात्मिक' तळमळ कमी होत जाईल, खंतहि कमी होईल आणि भयाकुलताहि कमी होईल. मग कर्तव्याचरण निष्कामपणें करावें असें त्याला वाटणार नाहीं कारण स्वतःच्या व इतरांच्या सुखासाठींच तो योग्य काय तें करील. तसेंच प्रणयाचा, कलात्मकतेचा व ज्ञानाचा अनुभव घेतांना माणसाला आपल्या इंद्रियांचा व इंद्रियगम्य अनुभवांचा तिरस्कार वाटणार नाहीं. आपल्या **सुखाला, ज्ञानाला** व **नीतिमत्तेला मर्यादा आहेत** हें त्याला खरोखर पटेल व तसें **मर्यादाशील आचरण** तो मग करील. अशी मर्यादाशील माणसें आज फार थोडीं आहेत व तें साहजिक आहे. कारण परंपरेनें आम्हाला सर्वांना असें शिकवलें आहे कीं आपल्याला मर्यादा असल्या तरी आपण परमेश्वराचे अंश आहोत, ब्रह्मस्वरूपी जाऊं शकणारे आत्मे आहोत व म्हणून मर्यादा उल्लंघिणेंहि आपल्याला शक्य आहे. ही जुनी शिकवण विसरणें व या अर्थानें नास्तिक होऊन मर्यादा मानणारा माणूस होणें ही माझी आदर्श माणसाची कल्पना आहे. • •

## सौ. ज्योत्स्ना भोळे

रंगभूमीची निस्सीम उपासिका. चतुरंग गाणें श्रोत्यांचा कल अजमावून गाणारी ज्योत्स्नाबाईंसारखी गायिका विरळा !

आपल्यामागून रंगभूमीला आधार म्हणून फक्त ज्योत्स्नाबाईंच दिसतात हे नटसम्राट बालगंधर्वांचे उद्गार; तर ज्योत्स्नाबाईंमुळें मी कवि झालों असें प्रथितयश काणेकरांनीं लिहून ठेविलें आहे.

---

उ. १—जगांत ईश्वर आहे, अशी माझी श्रद्धा आहे. ईश्वर साकार रूपानें असेलच असें नाहीं. पण ह्या जगाचीं सूत्रें चालविणारी एक अदृश्य आणि महान् शक्ति कुठेंतरी वावरते आहे, असं मला सारखं वाटतं. ईश्वरावरील माझी श्रद्धा दृढ करणारे अनेक प्रसंग मी अनुभवले असल्यामुळें 'ईश्वर नाहीं' असं मी म्हणूच शकत नाहीं. आणि तो आहे ह्यावरच माझी जास्त श्रद्धा आहे.



उ. २—माणसानें जगांत माणुसकीनें वागावें हा सर्वांत मोठा धर्म मी मानते.

उ. ३—सध्यां तरी मी कुठल्याहि धार्मिक ग्रंथाचं वाचन करीत नाहीं. मात्र हें सर्व वाचन लहानपणीं केलेलं आहे. हल्लीं मी न चुकतां फक्त सकाळीं प्रार्थना म्हणते आणि झोंपताना मिनिटभर देवाचं चिंतन करून मग झोंपतें. वर्षानुवर्षें पोथ्या वाचणारीं आणि भक्ति करणारीं माणसें शांत वृत्तिची व परनिंदा न करणारीं असावींत असं मला वाटतं. पण जगांत पाहूं गेल्यास असा मनुष्य विरळाच ! देवाची पूजा करून उठल्यावर, दुसऱ्याच क्षणीं दुसऱ्याला उणं बोलून दुखवणाऱ्या माण-

( पान ५४ वर पहा. )



# रेषा

ती निळसर चिठी मिळाल्यापासून इंदिरा बदलली होती. अबोल झाली होती. गोड गोड गुदगुल्या करणारी ती चिठी, इंदिरा जपून ठेवणार होती. आपल्यावरील प्रेमाचा तो पुरावा ती जिवापलिकडे बाळगणार होती. परंतु आतां तिला त्या चिठीचीही भीति वाटूं लागली.........

पायांतील चपला इंदिरेनें कोपऱ्यांत भिरकावल्या आणि घाईघाईनें ती माजघरांत आली. हातांतील पुस्तकें तिनें शेल्फवर रचून ठेवली आणि अधीऱ्या नजरेनें सभोंवार पाहून घेतलें. बाबा अजून ऑफीसांतून परतले नव्हते. आईची स्वयंपाकघरांतून चाहूल ऐकूं येत होती तेवढीच. घरांत आणि कुणीहि नव्हते. सारी सामसूम होती.

इंदिरेनें मग हळूच इतिहासाचें जाड पुस्तक उचललें; त्याची पानं भराभर उलटली आणि मग पानांमध्यें ठेवलेल्या त्या इवल्याशा निळसर चिठीशीं ती अडखळली. कांपऱ्या हातांनीं तिनें ती चिठी उलगडली. तिची नजर त्या बारीक वळणदार अक्षरांवरून भिरभिरली. एकादें मोरपीस हळुवारपणानें अंगावरून फिरावें तसें तिला वाटलें. उगीचच लाजल्यासारखें झालें.

" इंदू ऽ आलीस का ? "

आईच्या हांकेसरशीं इंदिरा केवढांदा दचकली. आईनें आपल्याला पाहिलें तर नाहीं ना या भीतीनें तिनें बावरून स्वयंपाकघराडे डोकावलें. पाठमोरी बसून आई कांदे चिरीत होती. तिनें सुटकेचा निःश्वास सोडला.

" आलें. "



घाईघाईनें तिनें चिठी दुमडली. हलक्या हातांनीं त्या पुस्तकांत जागच्याजागीं परत ठेवली आणि मग ती कपडे बदलूं लागली.

कपडे बदलतांना आज इंदिरा किती गोंधळली. स्कर्ट तर आधीं तिनें उलटाच चढविला होता. आपल्या मनांतील गोंधळ लक्षांत येतांच खालचा ओंठ तिनें दातांनीं हळूंच चावला. स्वतःशींच ती हंसली आणि स्वयंपाकघराकडे वळली.

शनिवार असल्यामुळें आईनें चहाची तयारी चालविली होती. बटाटेपोह्यांचा बेत दिसत होता. फोडणीची तयारी चालली होती. आई चिरीत असलेल्या कांद्यांचा उग्र दर्प इंदिरेच्या नाकाडोळ्यांत शिरला. तिच्या डोळ्यांत टचकन् पाणीं उभें राहिलें.

मोरींत जाऊन तिनें तोंड धुतलें. गार गार पाण्याच्या सुखद स्पर्शानें तिच्या कोमेजलेल्या चेहऱ्यावर जरा टवटवी आली. किती उकडत होतें आज. गळ्याखालीं जमलेला घाम तिनें काळजीपूर्वक धुवून काढला. कपाळावर आलेली एक चुकार बट हलक्या बोटांनीं मागें सारली. साबणाचा फेस गालावर चोळतांना तिला हायसें वाटलें. परंतु नाकापाशीं उगवलेल्या लालसर पुटकुळीला तिचा हात लागला मात्र; ती एकदम चरकली. आतांपर्यंत गोरा नितळ असलेला तिचा गाल कालपर्यंत किती सुंदर दिसत होता. ही

पुटकुळी उगवली आणि तिचा चेहरा किती कुरूप दिसूं लागला होता. अस्सा राग येत असे तिला त्या पुटकुळीचा.

साबणाचा फेस धुवून काढून ती बाहेर आली. हँगरवर घडी करून ठेवलेला टर्कीश टॉवेल तिनें जरा उडी मारून खाली ओढला आणि चेहरा पुसत पुसत ती बाहेर गॅलरींत जाऊं लागली.

चिरलेला कांदा ठेवलेली बशी बाजूला सारून विळीचें पातें दुमडून ठेवीत तिच्या आईनें विचारलें.

" इंदू, अग अनंतराव आले का पहा जरा. "

गॅलरींत आलेल्या इंदिरेनें शेजारच्या दाराला लावलेले कुलूप पाहिले. तिथूनच ती म्हणाली.

" अजून नाहीं आले. आज उशीर झाला त्यानां नाहीं का ? "

" हो शनिवारीं तर बारा वाजतांच यायचे ते. "

इंदूला आठवण झाली, आज अनंतरावांनीं तिला नुकतीच प्रसिद्ध झालेली एक नवी कादंबरी आणून देण्याचे कबूल केले होते. एका सुप्रसिद्ध वृत्तपत्राच्या कार्यालयांत उपसंपादकाच्या जागेवर असल्या-मुळें अभिप्रायार्थ आलेली नवीं पुस्तकें अनंतरावांकडे नेहमीं पडून राहात. आणलेलीं पुस्तकें इंदिरेला द्यायला मात्र ते कधींच विसरत नसत. घरबसल्या मिळणाऱ्या या पुस्तकांनीं इंदिरेला वाचनाची चांगलीच गोडी लागली होती. अनंतराव कुठलें नवीन पुस्तक आणतात याची ती उत्सुकतेनें वाट पाहात बसे.

टॉवेलनें चेहरा पुसतां पुसतां तिनें समोर पाहिलें. पुढच्या बिल्डिंगमध्यें राहाणारा तो कॉलेजकुमार गॅलरींत ग्रामोफोन लावून ऐकत बसला होता; आणि हातांतले कुठले तरी सिनेमा साप्ताहिक चाळत होता. आरामखुर्चींत तो रेलला होता आणि त्यानें आपले पाय पुढच्या खिडकीच्या कठड्याला टेकवले होते. त्यामुळें जरा सरकलेल्या त्याच्या नाईटसूटमधून त्याचे उघडे पाय दिसत होते. किती गोरे गोरे होते ते.

तबकडींत बंदिस्त झालेले शब्द मुक्त होऊन भिरभिरत इंदिरेच्या कानांवर आदळत होते. 'वन् टु एण्ड वन् टु एण्ड आय् लव्ह यू...मस्ट प्ले ऽ द गेम ऑफ ला ऽ ऽ व्ह......' इंदिरेचे अंग उगीच शहारले. त्या तालाबरोबर तिचे मन झोके घेऊं लागले, कांहीतरी चुकल्याचुकल्यासारखें वाटूं लागले.

आणि मग अचानक तिला त्या चिठीची आठवण झाली. इतिहासाच्या पुस्तकांत नीट घडी करून जपून ठेवलेली ती निळसर चिठी. बारक्या वळणदार अक्षरांत लिहिलेली चिठी. गुदगुल्या करणारी चिठी. त्या चिठीची आठवण झाली आणि इंदिरेला तो प्रसंग आठवला.

दुसऱ्या तासाची घंटा झाली. आणि लगबगीनें तिनें शाळेच्या विज्ञानविभागांतील प्रयोगालयांत प्रवेश केला होता. पहिल्या तासाला त्याठिकाणीं बसलेली मॅट्रीकच्या वर्गातली मुलें उठून चालली होती. आणि इंदिरेच्या वर्गातील मुलांची जागा पकडण्याकरितां धांवपळ सुरू झाली होती. तिच्या मैत्रिणीनीं पटापट पुढची बाकें काबीज केली. आणि इंदिरेला चार पांच रांगेपलीकडील बाकावर बसावें लागलें. हातांतील पुस्तकें तिनें पुढच्या डेस्कवर ठेवली आणि त्याच वेळीं तिच्या हाताला कांहींतरी लागलें. काय आहे ते पाहाण्याकरितां तिनें आंत हात घातला होता आणि ती चिठी तिच्या हाताला लागली होती. उत्सुकतेनें तिनें ती उलगडून पाहिली होती. सुंदर बारीक वळणदार अक्षरांत काळ्या शाईनें लिहिलेलें तें पत्र होतें. खाली कुणाची सही नव्हती. फक्त तुझाच या शब्दानें ते पत्र संपलें होतें. कुणा अनामिकानें कुणा अनामिकेला लिहिलेलें ते प्रेमपत्र होतें. हळुवार, प्रेमळ शब्दांनीं कुणा प्रियकरानें आपल्या लाडकेशीं त्या पत्रांत आपलें हृद्गत उघड केले होतें. ते शब्द इंदिरेला नवीन होते. त्यांतील शब्दांचा आशय तिला समजत नव्हता. तरी पण ते वाचत असतां तिला कांहींतरी अज्ञात, अननुभूत संवेदना होत होत्या. कांहींतरी वेगळें गवसल्याचा आनंद तिला होत होता. परंतु हें फक्त क्षणभरच. मग ती एकदम कावरीबावरी झाली होती. आपल्याला कुणी पाहिलें नाहीं ना या विचारानें ती बावरली होती.

तास सुरू झाला. गुरुजी विज्ञानांतील कठीण प्रश्न समजावून देऊं लागले. सारा वर्ग तत्परतेनें ऐकूं लागला. परंतु इंदिरेचें लक्ष उडालें होतें. ती चिठी तिनें आपल्या पुस्तकांत लपवून ठेविली होती तरी त्यांतील मजकूर सारखा तिच्या डोळ्यांसमोर येत होता. गुदगुल्या करीत होता. कुणीतरी हळुवारपणें आपल्या अंगावरून हात फिरविल्यासारखे, आपल्या नकळत मानेवर फुंकर घातल्यासारखे इंदिरेला वाटले.

ती चिठी आपल्यालाच उद्देशूनच लिहिली असावी असें तिला वाटूं लागले; नव्हें तिची खात्रीच पटली. त्या पत्रांत वर्णन केल्याप्रमाणें टपोरे डोळे, लालचुटुक ओठ आणखी कुणाचे होते बरे ? बारीक पाणीदार मोत्यांची माळ तिच्या वर्गातील मुलींपैकीं तिच्याशिवाय आणखी कोण घालीत होती ? निळ्या स्कर्टवर मखमालीचा लालपट्टा तिच्या-शिवाय कोण घालीत असे ? चिठी आपल्यालाच लिहिली आहे याबद्दल इंदिरेला संशय राहिला नाहीं. फक्त ती कुणी लिहिली असेल हें तिला ठरवितां येईना. अक्षर तर फारच सुंदर होतं. परंतु ते कुणाचं असावं याबद्दल तिला कांहीच अंदाज बांधतां येईना. शशिकांत देवळे असेल कां ? की शरद् नाडकर्णी असेल ? कुणी का असेना. कुणीतरी आपलं हृदय तिच्याशीं मोकळं केलं होतं खरं. तिच्यावर कुणींतरी प्रेम करीत होतं. ती कुणाला तरी हवीहवीशी वाटत होती. आणि याचेच तिला सुख वाटत होते. अपूर्व असें आपण कांहीं तरी मिळवले आहे असें तिला वाटत होते.

असें कां वाटत होतें हें मात्र तिला सांगतां येत नव्हतें. खरं म्हणजे तें पत्र वाचल्याबरोबर तिला राग यायला पाहिजे होता. मुलांचा हा चावटपणा गुरुजींच्या नजरेला आणून देऊन त्यांना चांगली अद्दल घडवायला पाहिजे होती. इंदिरेच्या मनांत क्षणभरच हा विचार आला; परंतु ती तसें करूं शकली नाहीं. त्या पत्रानें तिच्या मनाला समाधान झाले होते. तिच्या हृदयांत गोड गोड उर्मी उठविल्या होत्या त्या पत्रानें. त्याच्याशीं ती कृतघ्न होणार नव्हती.

आ नं द व र्टी

तिच्या आयुष्यांत पहिल्यांदाच तिला मिळालेला तो अमोल ठेवा होता. तीं तो जपून ठेवणार होती. ती वळणदार अक्षरें वाचतांना जो अपूर्व आनंद ती अनुभवली होती, तो ती तसाच वरचेवर अनुभवणार होती. सुखावणार होती. आजपर्यंत कथाकादंबऱ्यांतून तिनें वाचलेले प्रेम ती आतां अनुभवणार होती. आणि यामुळेंच ती बावरली होती. गोंधळली होती.

त्या पत्राचें काय करावें हें तिला समजत नव्हतें. फक्त ते पुन्हां पुन्हां वाचण्यांतच तिला सारें कांहीं गवसल्याचा आनंद होत होता. कितीतरी विषय तिला अजून उलगडले नव्हते; परंतु तरी तिला वाटत होते कीं आपण एकदम मोठी झालें आहे. आपल्यावर कुणातरी मुलानें प्रेम करण्याइतपत आपण मोठी झालें आहे. आपण आतां लहानपणींची इंदिरा राहिलें नाहीं. आतां जरा गंभीरपणानें वागलें पाहिजे, कमी बोललें पाहिजे, असें तिला वाटूं लागलें. आणि मग एकदम तिला या विचारांची लाज वाटूं लागली. गुरुजींकडे पाहाण्याची लाज वाटूं लागली. मैत्रिणीकडे पाहाण्याचीसुद्धां लाज वाटूं लागली. तास सुटल्यावर त्यांच्याशीं गप्पा छाटतांना किती किती अडखळली इंदिरा. आपला बावरलेला, गोंधळलेला चेहरा बघून त्यांनीं थट्टा केल्यावर तर इंदिरा किती लाजली होती.

" पोस्टमन्. "

दारांत उभा राहून हातांतल्या पत्रांशीं चाळा करीत पोस्टमन् उभा होता. इंदिरेनें चमकून त्याच्याकडे पाहिलें.

आपल्या पिशवींतून एक मासिक बाहेर काढून त्यानें ते पुढें केलें. पलीकडच्या खुर्चीवर हातांतला टॉवेल फेकून इंदिरा दाराजवळ गेली. इंदिरेच्या हाताला त्याच्या बोटांचा फक्त ओझरता स्पर्श झाला मात्र, किती घाबरली इंदिरा. खरं म्हणजे तो कांही नवा नव्हता. जुनाच होता ओळखीचा. पोस्टमन् असला तरी तरुण उमदा होता. हंसतमुख होता. त्याच्या कमानदार ओठांवरची ती कोरीव मिशी तर त्याला फारच खुलून दिसत असे. त्याच्या मनगटावर जरा जास्त केस होते खरे. परंतु गोऱ्या कातडीवर ते कुरळे केस फारच सुंदर दिसत. त्याला पाहिल्याबरोबर इंदिरेला कांहींतरीच वाटलें. असें तिला कधींच झालें नव्हतें. ती अधिकच गोंधळली. जातां जातां मागें वळून त्यानें पुन्हां एकदां स्मित हास्य केलें आणि इंदिरेला गुदमरल्यासारखें झालें. त्याच्यापासून कांहींतरी लपवून ठेवले पाहिजे असें तिला वाटूं लागले. परंतु काय लपवले पाहिजे हें तिला समजेना.

ती तशीच आंत आली. मासिकावरचें वेष्टन तिनें एकदां निरखून पाहिलें. त्याच्या वरचा पत्ता वाचला आणि मग ते टराटर फाडून टाकलें. मुखपृष्ठ तर फारच सुंदर होतें. तिची नजर तिथेंच खिळून राहिली. कमरेवर भरलेली घागर घेतलेली राधा खिळल्यासारखी उभी होती. आणि तिच्या पाठीमागें मुरलीधर कृष्ण चित्रकारानें रंगविला होता. जणूं कांहीं तो तिच्या कानांत कांहीं तरी सांगत होता. कुजबुजत होता. आणि त्याच्या त्या गुजगोष्टीनीं राधा भान विसरली होती. रंगली होती. भरलेल्या घागरींतले पाणी आपल्या साडीवर सांडते आहे याचीहि तिला शुद्ध नव्हती.

इंदिरेची नजर त्या चित्रावर खिळून राहिली. खूप खूप आवडलें तिला तें चित्र, सारखें पाहात राहावेसें वाटूं लागले तिला. तिच्या नकळत तिनें सुस्कारा सोडला. जणूं राधेच्या भावनेशीं ती तद्रूप झाली होती. आणि मग श्रीकृष्णाकडे पाहातां पाहतां ती लाजली. त्याच्याकडे ज्यास्त वेळ पाहात राहाणें तिला जमलें नाहीं. भराभर तिनें मासिकाची पानें उलटली. चौकटींत छापलेले विनोद वाचून काढले. कविता ती वाचणार होती. परंतु बाबा आल्याची चाहूल लागली. आईची हांकहि ऐकूं आली.

" इंदू, काय करते आहेस बाहेर ? जरा आंत ये ना. "

" आलें, आलें. "

इंदिरा उठणार इतक्यांत जोराचा वारा झाला. खिडक्यांची तावदानें फाड्फाड् वाजलीं. भिंतीवरची कॅलेंडरें फडफडली. इंदिरा उठली. खिडक्यांचे कोयंडे तिनें नीट लावले. उलटलेलीं कॅलेंडरें सारखी केलीं. जमिनीवर पडलेले एक कॅलेंडर तिनें उचललें. ते कॅलेंडर लावल्याठिकाणचा खिळाहि खाली निखळला होता.

" हे कॅलेंडर तेव्हढें लावून येतें ग. "

आणि ती खिळा शोधूं लागली. बाबांच्या टेबलावरचा लोखंडी पेपरवेट उचलून तिनें तो खिळा ठोकला. ते कॅलेंडर तिचें फार आवडते होतें. त्याच्यावरचें ते सिंहाचें चित्र तिला किती आवडायचें. त्याची ती फुललेली घायाळ, रुंद जबडा, बारीक कंबर आणि पीळदार, दमदार शरीर तिला किती आवडायचें. एकटक ती त्या चित्राकडे पाहात राहायची. परंतु आज कां कोण जाणें त्या चित्राकडे पाहाण्याचें धैर्य तिला होईना. त्या मर्दानी कसदार शरीराच्या सिहाचें तिला अकारण भय वाटूं लागलें. त्याच्या डोळ्यांतील जळता अंगार तिला भाजूं लागला. आपल्यावर यानें आत्तां झेप घेतली तर आपली स्थिति काय होईल या जाणिवेनें तिचा थरकांप उडाला. तिचें काळीज धडधडूं लागलें. खाली पडलेले ते कॅलेंडर उचलून तिनें कसेबसे त्या खिळ्याला अडकवले आणि उगीचच आपले डोळे मिटून घेतले. अजूनहि तिला वाटत होते कीं तो सिंह आपल्याकडेच पाहातो आहे. आसुसलेल्या नजरेनें आपल्यापाशीं कांहींतरी शोधतो आहे.

काय करावें तिला समजेनासे झालें. त्याच्या पुढ्यांतून पळून जावेसें वाटलें आणि मग लगबगीनें ती स्वयंपाक घरांत गेली.

" काय करीत होतीस ग बाहेर ? "

" जोराचा वारा आला ग, अन् तें कॅलेंडर खाली पडलं. "

" कुठचं कॅलेंडर ? "

" ते सिंहाचं. "

हें सांगतांना इंदिरेला धांप लागली होती. तिचा स्वर घोगरा झाला होता. छाती वरखाली होत होती. आपल्यांत झालेला हा बदल आईच्या लक्षांत येऊं नये म्हणून इंदिरेची धडपड सुरू होती. कपाटांतील कपबशा तिनें आपण होऊनच काढायला सुरवात केली. कपबशा खाली काढून ठेवल्या आणि चहांत साखर टाकण्याकरितां ती साखरेचा डबा शोधूं लागली. कधीं न येणारी इंदिरा आज आपल्या मदतीला आलेली पाहून तिच्या आईला अचंबा वाटला.

" आईला मदत करायचं ठरवलंस् कीं काय ? "

इंदिरा नुसतेंच हंसली.

" बरं राहूं दे ते. मी घेतें पाहून. तें दूध तेवढं नेऊन दे बघूं अनंतरावांकडे. नुसतेच आलेयत् ते ऑफीसमधून. "

" हं. "

इंदिरेनें दुधाचं पातेलं उचललं. दूध जरा कढतच होतं. पातेलं गरम होतं. पण एवढं गरम ती उचलूं शकत होती.

लगबगीनें ती अनंतरावांच्या खोलीवर आली. आज कुठलं पुस्तक आणलं असेल अनंतरावांनीं, तिच्या मनांत विचार आला. अनंतरावांनीं अंगांतला शर्ट काढला होता. बॉडी गंजीफ्राकमधून त्यांचें पीळदार अंग फार सुरेख दिसत होते.

" काय इंदू; आज तुझ्या आवडीच्या लेखकाचं पुस्तक आणलंय् बघ. "

" कोण खांडेकर ? "

" अंहं; दांडेकर. नुकतंच प्रसिद्ध झालंय्. या खेपेला तुझी पाळी. तूंच वाच आधी; आणि तुझा अभिप्राय सांग मला. मी लिहून काढतों; अन् पाठवतों प्रेसला. कोण बसतोय लेकाचा वाचत. वेळ कुठें आहे आम्हांला ? "

" आंत घडवंचीवर ठेवूं का दूध ? " इंदिरेनें विचारलें.

" नको, दे इथें; मी ठेवतों कपाटांत. " आणि अनंतरावांनीं पुढें होऊन तिच्या हातांतून पातेलें घेतले.

" किती गरम आहे ग पातेलं. कसं उचलून आणलंस तूं ? "

" त्यांत काय; मला नाहीं वाटत एवढं. "

" वा: गरम नाहीं लागलं बोटांना ? आतां मोठी झालीस वाटतं तूं. " आणि अनंतराव मोठ्यानं हंसले.

इंदिरेला वाटलें त्याची नजर आपल्या छातीवरून भिरभिरत गेली. ती लाजली. कांहींतरी लपवलं पाहिजे असं तिला वाटूं लागलं. आपण आतां मोठी झालें हें तिला पटलें. अनंतरावाबरोबर जास्त वेळ बोलत राहणं तिला आवडलं नाहीं. त्यांच्या नजरेशीं ती नजर भिडवूं शकली नाहीं. मघाच्या त्या सिंहाच्या नजरेंत आणि अनंतरावांच्या नजरेंत तिला विलक्षण साम्य दिसूं लागलं. तिचा ऊर धडधडूं लागला. तिथून पळून जावंसं तिला वाटलं.

" बरं मग येतें मी. आई वाट पहाते आहे. " येवढें सांगून ती धूम पळत गेली.

" अग घेऊन जा, आत्तांच ने. " म्हणणाऱ्या अनंतरावांचे शब्द तिला ऐकूंच गेले नाहींत.

ती आपल्या खोलींत परतली तेव्हां धामधूम झाली होती. खुर्चीवर पडलेला टॉवेल उचलून तिनें आपला चेहरा पुसून काढला. गुदमरल्यासारखें वाटलें तिला. तरीसुद्धां डोक्यावरून पांघरूण घेऊन गपचिप पडून राहावेसें वाटत होतें. मघाचा तो कॉलेजकुमार, तो पोस्टमन आणि अनंतराव हे आज निराळेच वाटूं लागले. त्यांची भीति वाटूं लागली तिला. परंतु त्या भीतींतहि सुखाची संवेदना होती. त्यांना भिण्यासारखं असं कां व्हावं हें तिला उमजत नव्हतं.

ती निळसर चिठी मिळाल्यापासून इंदिरा बदलली होती. अबोल झाली होती. त्या चिठीचीच करामत असावी ही. गोड गोड गुदगुल्या करणारी ती चिठी; इंदिरा जपून ठेवणार होती. आपल्यावरील प्रेमाचा तो पुरावा ती जिवापलिकडे बाळगणार होती. परंतु आतां तिला त्या चिठीचीहि भीति वाटूं लागली. त्या गोड गोड शब्दांच्या पल्यांत कसलें तरी विष असल्याचा तिला संशय येऊं लागला. आपल्यापासून त्या अज्ञात इसमाला कांहीतरी पाहिजे आहे; आणि त्यासाठींच त्या प्रेमळ शब्दांची साखर त्या पत्रांत पेरली आहे असें तिला वाटूं लागलें. त्या चिठीचा तिला राग आला. आपल्याला कुणीतरी फसविलें आहे असें तिला वाटूं लागले. आपण अपराधी आहोंत, न करण्यासारखें आपण कांहीतरी केलें आहे; कुठलीतरी मर्यादारेषा आपण नकळत ओलांडली आहे असे तिला वाटूं लागले.

ती उठली. शेल्फवरचे ते इतिहासाचें पुस्तक तिनें खाली ओढले. भराभर पानें उलटून ती चिठी बाहेर काढली, उलगडली. परंतु ती पुन्हां वाचण्याचें धैर्य तिला झालें नाहीं. धडधडणाऱ्या अंतःकरणानें तिनें परत घडी घातली आणि मग आवेगानें तिचे तुकडे तुकडे केले. सुटकेचा एक दीर्घ निःश्वास तिच्या नकळत बाहेर पडला. तिचे ओठ थरथरत होते. आपल्याला आवळणारा अदृश्य पाश तोडून टाकल्याचा अव्यक्त आनंद ती अनुभवीत होती. कांहीतरी गवसल्याचें सुख तिला झाले होते. परंतु असें आपल्याला कां वाटतें हें मात्र तिला सांगतां आले नसतें.

कागदाचे ते कपटे तिनें काळजीपूर्वक कोपऱ्यांतल्या कचऱ्याच्या पेटींत टाकले आणि ती स्वयंपाकघरांत गेली. बाबा पाटावर बसून चहा पीत होते. तिच्यासाठीं आईनें ठेवलेल्या दुसऱ्या पाटावर ती बसली.

" काय इंदू; आज येणार का सिनेमाला ? संटूलला कालपासून नवीन सिनेमा आला आहे. पुष्कळ दिवसांत नाहीं गेलों आपण. " तिच्या गोऱ्यामोऱ्या चेहऱ्याकडे कौतुकानें पाहात बाबा म्हणाले.

" हं. "

इंदूला जास्त बोलणं जमलं नाहीं. बाबांच्या डोळ्यांना डोळा भिडवणंहि तिला कठीण वाटूं लागलं. ती अपराधाची जाणीव परत उफाळून वर आली. ओलांडलेल्या त्या रेषेच्या अलीकडे आतां आपण कधींच येणार नाहीं असें उगीचच वाटूं लागले. ती गुदमरली घुटमळली आणि मग कांहीं न बोलतां कडत कडत चहाचा कप तिनें झटकन् ओठांना लावला.



दिवाळी अंकाची (अ) पूर्व तयारी :

हे दिवाळी अंक–( आमच्यासकट ) सर्वांना सुखसमृद्धीचे जावोत !

# प्रेक्षक आणि नवचित्रकार

— शां. शं. रेगे

"तुमचं एखादं चित्र तयार करतांना मला बघायचं आहे." एका नवचित्रकाराला मीं एकदां विचारलं.

"अवश्य, अवश्य, उद्यांच या, प्रदर्शनासाटीं एक नवीन पद्धतीचं चित्र मीं सुरू करणार आहे."

दुसऱ्या दिवशीं मीं स्टुडिओंत गेलों तेव्हां चित्रकारांनी सर्व तयारी केलेली होती. त्या दिवशीं मॉडेल वगैरे न घेतां नुसत्या कल्पनेनेंच चित्र काढण्याचा त्यांचा विचार दिसला. प्लेट हातांत घेऊन त्यांनी कागदावर भराभर रंगानींच आकृति काढायला सुरवात केली. रंगावर रंग चढत होते. कांहीं विचित्र आकृत्या निर्माण होत होत्या. दहा मिनिटांत त्यांनी चित्र पुरं केलं आणि ते वाळेपर्यंत मला म्हणाले, "हें पॉइंटिलिझम् पद्धतीचं चित्रण आहे. ह्या पद्धतीनं चित्राची रूपरेषा चित्र काढतां काढतां बदलता येते. आतां हेंच पहा. माझा विचार होता 'वादळाची रात्र' रेखाटण्याचा पण चुकून ह्या चंद्राच्या जागीं लाल रंग लागला. आणि अचानक मला एक नवीनच कल्पना सुचली. काय असेल हें चित्र सांगा पाहूं ?"



मी डोकं खाजवलं. चित्र दुरून, जवळून, बाजूनं, निरखून पाहिलं. पण कांहींच पत्ता लागेना. समुद्राच्या लाटा, चंद्र व फडफडणाऱ्या शिडासारखं कांहीं दिसतांच मला चौपाटीची आठवण झाली, आणि पौर्णिमेची रात्र ही स्मरली. पण नवचित्रकलेला ही जुनी कोष्टकं कशी लागूं करायची, ह्या विचारांत मीं असतां ते म्हणाले, "नाहीं ना सांगता येत ! ह्या चित्राचं नांव "भेळपुरीवाला" मी चमकलों. चित्रांत व्यक्तीतर कुठं दिसत नव्हती, मग हें नांव असं कसं कलावंत पुढं म्हणाले, "चित्र symbolistic पद्धतीचं आहे. तुम्हां प्रेक्षकांना प्रथमदर्शनीं हें चित्रं निसर्गाचं वाटेल, पण त्यांतली रंगसंगति पाहा. रेषांचा Futuristic पद्धतीचा वेग पाहा आणि मग भाववाचक पद्धतीनं त्यांतला अर्थ शोधण्याचा प्रयत्न करा." कलावंतांचं म्हणणं खरं होतं, नाहीं तर चित्रांतला चंद्र लाल कां, आणि त्या प्रकाशांतही त्या लाटांचा फेस असा शुभ्र कां, तसंच तें फडफडणारं वस्त्रही असं चिकट कां ? ( रंगांतील तफावत अगदीं स्पष्ट दिसत होती. )

कलावंत सांगू लागले, "हें कोपऱ्यांतलं लाल वर्तुळ म्हणजे चटणीनं लडबडलेली पुरी, हा पांढरा धूसर फेस हें दहिंवड्याचं दहीं, बाजूला दिसणारे हे काळे दगड म्हणजे रगड्यांतले चणे आणि हें फडफडणारं वस्त्र हे त्या भेळवाल्याचं हात पुसायचं फडकं. जुन्या चित्रपद्धतीनं असा विचार करणं गैर वाटेल. पण मॉडर्न आर्ट पद्धतीनं चित्राचे निरनिराळे भाग न तपासतां सबंध चित्राचा एकदम प्रतीत होणारा अर्थ हा समजायचा असतो. आतां समजलं ना हें चित्र ?

नवचित्रकला प्रेक्षकांना नेहमींच बुचकळ्यांत टाकते. जुनी चित्रकला रंग, रूप व चित्रण ह्याबाबतींत प्रतिगामी होती पण आजच्या कलावंतानं ह्या सर्व सीमा ओलांडल्या आहेत. 'गुणिषु नच रंगं नच भयः' असं एका प्रख्यात कलासमीक्षकानं म्हटल्याप्रमाणं, नवचित्रकार बंडाचं निशाण घेऊन वाटेल ते रंग व चाहेल ते विषय निर्भयपणं चितारण्याची आकांक्षा बाळगून असतो. नवचित्रकलेबद्दल आपलं ज्ञान वाढावं—ती नीट समजून घ्यावी, ह्यासाठीं वाङ्मय वाचण्यापेक्षां प्रत्यक्ष चित्रं पाहिली तर जास्त बरं



अनुक्रमणिका

म्हणून एका नवचित्रकाचं प्रदर्शन् पाहण्यास गेलों. प्रदर्शनाचा तो अखेरचा दिवस असावा. कारण हॉलवर अगदींच शुकशुकाट होता. एक भोंगळ पायजमा, चित्र विचित्र आकृतींचा बुशकोट, डोळ्यांना काळा पारदर्शक चष्मा व वेढ्ब केसांचीं झुलपं अशा अवतारांत एक व्यक्ति तिथें फेऱ्या मारीत होती. जाहिरातीच्या चित्रावरुन हेच ते कलाकार असावे हें मीं ओळखलं. ते फिरतांना, नाकासमोर, तीक्ष्ण दृष्टीनं पाहात हवेंत हाताचे उभेआडवे फराटे काढत असल्यासारखे दिसत होते. प्रथम मला वाटलं कीं तोंडांतल्या चिरुटाच्या धुराचे हल्ले परतवण्याचा स्वारीचा प्रयत्न असावा. पण हातवाऱ्यांची असंबद्ध हालचाल पाहून हा कांहींतरी कलेचाच प्रकार असावा हें मी ओळखलं.

मी हॉलच्या आंत शिरतांच, समोरच्या चित्राकडे माझं लक्ष वेधलं गेलं म्हणून मी जरा थबकून, सावकाशपणं प्रत्येक भाग पाहूं लागलों. पण एकदोन मिनिटांतच मला चक्कर आल्यासारखं झालं. दोनचारदां डोळे मिचकावले, पण त्यामुळं जास्तच अंधुक दिसायला लागलं, म्हणून बाजूच्या भिंतीचा आधार घेतला. मी शुद्धीवर येतांच मला त्या कलावंतानं सांवरुन धरल्याचं समजलं. "आप यहां अनोखे मालूम होते हैं" ह्या त्यांच्या शब्दांनीं मला जाग आली. "हें चित्र फारच परिणामकारक आहे. हा आमचा नेहमींचा अनुभव, आपणहि आज खरा ठरवलांत ! ह्या चित्राचं नांव आहे Ivy & the I Worry Tower. नवख्या प्रेक्षकाला ह्या टॉवरचं अकस्मात् दर्शन झाल्यामुळं, एकदम भोंवळ यावी इतकी त्याची उंची ( किंवा खोली ) आहे. आपल्या आयुष्यांत दुःख चक्रवाढव्याजानं वाढत जातं व त्याचा असा मिनार तयार होतो; पण त्याहि परिस्थितींत आशेची वेल त्याला सोडत नाहीं—ही चित्राची कथावस्तु. मानवाच्या दगडी हृदयावर हा मिनार उभा असतो, म्हणून हें ह्या कोपऱ्यांत हृदय दर्शविलं आहे. हें पहा—हा शेवाळी रंगाचा स्पंज दिसतो—तेंच तें मानवी हृदय. त्याच्याभोंवती काढलेला हा त्रिकोण—हा प्रेमाचा शाश्वत त्रिकोण ( eternal triangle ), बाजूला हा झुळकेदार व झिलईदार आकार दिसतो तो आत्म्याचा पक्षी..." तो कलावंत जेवढं जास्त समजावून देत होता तितका मीं अधिकाधिकच खोलांत चाललों होतों. त्या प्रसंगातून माझी सुटका केली ती हॉलच्या पठाणानं. "साहाब, टैम हो गया" असं म्हणत त्यानं भराभर दिवे घालवायला सुरवात केली त्यामुळं रसग्रहणाचा चोथा कलावंताच्या घशांतच घुटमळला. त्या रात्रीं स्वप्नांत तो Tower मला सारखा भेडसावत होता त्याचे लाल लाल डोळे माझ्याकडे रागानें पहात होते आणि एकदां तर त्या वळवळणाऱ्या वेलीनं माझा गळा आवळून टाकल्यामुळं माझा जीव गुदमरून मी ओरडलों देखील. नवचित्रकला किती परिणामकारक असते ह्याचा प्रत्यय मला त्या प्रसंगानं पुरेपुर आला.

"आपण टोपोल्स्की पाहिला आहे का ? चेकोव्हस्की—निदान, मायकोव्हस्की तरी ?..." नूतननवकला निकेतनाचे डायरेक्टर चक्रतुंड यांनीं, मीं जेव्हां त्यांच्याकडे गेलों तेव्हां विचारलं. ही शकलपच्मुचिरिच् सारखीं वाटणारीं नांवं त्यांनीं इस्कींत माझ्यावर फेकतांच मीं गोंधळून गेलों. मीं नाहीं म्हणतांच त्यांनीं चक्‌चक् करीत 'अगदींच फुकट गेला हा' अशी मुद्रा करत आपल्या Kindergarten वर्गात, मोठ्या नाइलाजानं प्रवेश दिला. ह्या वर्गात चित्रांची पुस्तकं पाहणं, ब्रशांचे नंबर व किंमती पाठ करणं, कशांत कुठचा रंग मिसळला म्हणजे काय होतं, इत्यादि प्राथमिक शिक्षणापासून तो कलावंतांचीं नांवं, त्यांच्या प्रसिद्ध कलाकृती व त्यांचीं चटकदार समीक्षणं वाचण्याचा अभ्यास मी केला. सहा महिन्यानंतर चित्रकलासमीक्षणाच्या elementary वर्गात मला प्रवेश मिळाला. ह्या वर्गात चित्रकलेची अतिशय आवड असणारी पण पेशानं डॉक्टर असलेली एक व्यक्ति माझी सहाध्यायी होती. एकदां आमच्या गुरुजींनं 'रुग्णशय्येवरील बालक' हें, आंतरराष्ट्रीय प्रदर्शनांत, उशिरां पोचल्यामुळं नाकारलेलं चित्र, चर्चेसाठीं ठेवलं होतं. वर्गात प्राथमिक ज्ञानाची चांचपणी करण्यासाठीं विद्यार्थ्यांना प्रश्न विचारण्यांत येत असत. त्यादिवशीं पहिलीच पाळी आली आमच्या डॉक्टरांवर. ते मोठ्या इर्षेनं त्या चित्राजवळ गेले. त्यांनीं चित्रांतल्या बालकाकडं सूक्ष्मरितीनं पाहिलं. "आपलं काय मत आहे ह्या बालकाबद्दल डॉक्टर ?" गुरुजीनं असं म्हणताच डॉक्टर एकदम म्हणाले It's easy 'मलेरिआ' वर्ग एकदम कां हसूं लागला याचं कारण डॉक्टरांना उमगलं नाहीं. पण पुन्हां ते त्या वर्गात कधीं दिसले नाहींत हे खरं.

नवचित्रकला कशी प्रत्यक्ष रेखाटतात ह्याचं कुतूहल मला फार वाटे; आणि म्हणून एक प्रख्यात Neo-Cubist आपलं प्रात्यक्षिक दाखविणार होता त्यावेळीं मीं हजर राहण्याचं ठरवलं. वेळेच्या पुष्कळ अगोदर जाऊन मी पुढचीच खुर्ची अडवून बसलों. सुरवातीला प्रास्ताविक भाषणं झाल्यावर कलावंत उठले व समोरच्या प्रेक्षकांतून कुणीहि मॉडेल म्हणून यावं अशी त्यानी विनंति केली. उत्साहानं मीच पुढं गेलों. मला त्यांनीं विशिष्ट कोन साधून एका खुर्चीवर पोज म्हणून बसवलं. सहाय्यकांनीं घोडा व पॅलेट आणून पुढं ठेवली. चित्रकारानीं प्रथम माझ्याकडे संथपणं निरखून पाहिलं. डोळे थोडे किलकिले केले, घोडा मागे ओढला आणि मग खिशांतून कांहीं काढून मागं जाऊन ठाकठोक केली.

( पान ५१ वर पहा )

दिवाळी अंकाची (अ)पूर्व तयारी : !!




बिचारा ( दुसरा कोण ? ) वाचक



# घातली ही पाणपोई

*मराठींतले आघाडीवरचे*
*तरुण विनोदी लेखक*
**श्री. वसंत सबनीस**
*यांनी*

माणसाला आयुष्यांत अनेक प्रश्न पडतात. आणि ते प्रश्न कुणाला विचारांत असादि त्याला प्रश्न पडतो. आपण आपले प्रश्न (प्रतिमहिन्याच्या दहा दिनांकापर्यंत) आम्हाला विचारा व त्याची खेळीमेळीनें दिलेली उत्तर तितक्याच खेळीमेळीनें ऐकायची सिद्धता ठेवा. येथें घातलेली ही पाणपोई आहे. एरंडाचे गुऱ्हाळ नव्हे, हे सर्व त्रस्त तृषितांच्या ध्यानांत येईलच ! दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचे पारितोषिक देणार आहोत. ह्या महिन्यांतील सर्वोत्तम प्रश्नाबद्दल दो. म. कावळे, मालवण यांना पांच रुपयांचे पारितोषिक देण्याचे ठरले आहे. त्यांना मनीऑर्डरीने पैसे पाठविले जातील.

**प्रश्न—हल्लीच्या स्त्रियांची वेषभूषा उत्तान असते अशी सर्वत्र ओरड आहे. ती सार्थ आहे काय ? स्त्रियांची वेषभूषा हीच सर्वस्वी तरुणाना विघडविण्यास कारणीभूत आहे असें मला तरी वाटत नाहीं. आपलें काय मत आहे ?**

**उत्तर**—हल्लीच्या सर्वच स्त्रियांच्या वेषभूषेला सरसकट उत्तान म्हणणें हा स्त्रियांवर आणि वेषभूषेवरही अन्याय आहे. उत्तानपणा आणि आकर्षकपणा यांतील फरक लक्षांत न घेणारे ओरड करतात. केवळ वेषभूषेनेंच तरुण विघडत असते तर वल्कलांच्या युगांत तरुणांच्या विघडण्याला सीमाच राहिली नसती. पण त्या काळीं कोणत्याही ऋषिमुनीनीं तरुण विघडल्याची तक्रार केल्याचें ऐकिवात नाहीं.

**श्री. दीनानाथ देशपांडे** (अमळनेर)

**प्रश्न—सुखी संसाराची आपल्या मतें व्याख्या काय ?**

**उत्तर**—संसार करतानाही ज्यांचे चेहेरे हसरे राहतात त्यांचा संसार सुखी समजावा.

**श्री. वा. वा. अमृते** (वसई)

**प्रश्न—लग्न हें स्त्रीचें साध्य कीं साधन ?**

**उत्तर**—धन.

**सौ. सुनीता सोमण** (मुंबई)

**प्रश्न—पुरुषाला पत्नीची जास्त जरूरी केव्हां असते ?**

**उत्तर**—खाणावळींतील अन्न प्रमाणाबाहेर बेचव लागूं लागतें तेव्हां—

**प्रश्न—सुखी व्हायचा उत्तम उपाय कोणता ?**

**उत्तर**—आपण सुखी आहोत कां दुःखी आहोंत याची चिकित्सा करीत न बसणें.

**श्री. वन्सीधर राणे** (मुंबई)

**प्रश्न—समजा आचार्य अत्रे मुख्य मंत्री झाले तर ?**

**उत्तर**—सात मजली हास्याची सोय करण्यासाठीं सचिवालयावर आणखी एक मजला बांधावा लागेल.

**श्री. श्री. चिं. फडके** (सोलापूर)

**प्रश्न— आपली अजूनपर्यंत फलद्रुप न झालेली इच्छा कोणती ?**

**उत्तर**—सर्व इच्छा फलद्रुप व्हाव्या ही—

**श्री. दिलीप शेट्ये** (मुलुंड)

**प्रश्न—जगांत अत्यंत सोपी गोष्ट कोणती ?**

**उत्तर**—संपादकांस प्रश्न विचारणें.

**श्री. राजा देशपांडे** (डोंबिवली)

**प्रश्न—एखाद्या मासिकाच्या संपादकाला प्रसन्न करण्याचा एकादा उपाय सुचवाल काय ?**

**उत्तर**—तुम्ही लिहिलेल्या कथा त्याच्याकडे न पाठविल्यास तो तुमच्यावर नेहमींच प्रसन्न राहील.

**श्री. द. आ. बारसकर** (मुंबई)

**प्रश्न—नवजात बालकें झोंपेंत केव्हां केव्हां स्वतःशीच हसतात वा रडतात यांचें कारण काय ?**

**उत्तर**—निसर्ग ह्यांच्याकडून भावी आयुष्याची रंगीत तालीम करून घेत असावा !

**श्री. दि. अ. जठार** (विलेपार्ले)

**प्रश्न—वधुपिता व वरपिता हे विवाहसमस्येस कितपत कारणीभूत आहेत ?**

**उत्तर**—त्यानीच या समस्येला जन्म दिला नाहीं काय ?

**श्री. प्रेमानंद वळवईकर** (मुंबई)

**प्रश्न—स्वतःमध्यें असलेली लेखनकला वाढविण्यासाठीं बुद्धिमत्तेइतकीच भावनाशीलतेचीही आवश्यकता असते काय ? नसल्यास तें अयशस्वितेचें गमक समजावें काय ?**

**उत्तर**—केवळ बुद्धिमत्ता व भावनाशीलता यामुळें लेखनकला वाढत नाहीं. प्रतिभा, वाचन, व्यासंग, मनन, निरीक्षण, लेखनाची कुवत वगैरे अनेक गोष्टी आवश्यक असतात.

**श्री. दो. म. कावळे**, (मालवण)

**प्रश्न—मला लेखक, कवि व पत्रकारही व्हावेसे वाटते; पण आजच्या धकाधकीच्या मामल्यांत मी कुठेच यशस्वी होणार नाहीं याची खात्री वाटते. तेव्हां मी मंगळावर जाऊं कीं हिमालयावर ?**

**उत्तर**—अपयशाबद्दलचा आत्मविश्वास कौतुकास्पद आहे. मंगळावर किंवा हिमालयावर जाण्यासाठींही धमक लागते. त्यापेक्षां आपल्या घरांतच बसलेले काय वाईट ?

**श्री. पुरुषोत्तम मांडे** (मुंबई)

**प्रश्न—माणूस कशासाठीं जगतो व त्याचा मोक्ष कशात असतो ?**

**उत्तर**—सध्यां तरी तो या दोन्ही प्रश्नांची उत्तरें शोधण्यासाठींच जगत आहे.

**कु. आशा गोळे** (मुंबई)

**प्रश्न—आयुष्यांतील अत्यंत सुखाचा क्षण कोणता ?**

**उत्तर**—ज्या क्षणीं कणभर सुख मणभर वाटते तो.

अनुक्रमणिका

**श्री. मो. ध. म्हाडळकर** ( मुंबई )

**प्रश्न—आजच्या शिक्षणापेक्षां जुनें शिक्षण फार चांगलें होतें असें जुनीं माणसें सांगतात हें कितपत सत्य आहे ?**

**उत्तर**—शिक्षण हें नेहमीच चांगलें असते. पण त्याचा उपयोग किंवा दुरुपयोग करणाऱ्याकडे पाहून शिक्षणाचा चांगलें वाईटपणा ठरविण्याची सवय आता सोडावी हें इष्ट नाहीं काय ? कारण शिक्षण हें गरजांनुसार बदलत जाते. आणि यापुढेंही तें बदलत जाणारच.

**सौ. शकुंतला निंबाळकर** ( फलटण )

**प्रश्न—माणसाना पडणारीं स्वप्नें हीं भविष्यांत घडणाऱ्या गोष्टींची निदर्शक असतात यावर आपला विश्वास आहे काय ? असल्यास कां आणि नसल्यास कां ?**

**उत्तर**—स्वप्न ही अत्यंत व्यक्तिगत बाब आहे. त्यामुळें त्यासंबंधीं सर्वसाधारण विधान चूक ठरेल. भविष्याची सूचना देणारीं स्वप्नें कांहीं व्यक्तींना दिसतात पण अशा व्यक्ति अपवादात्मक. आम्ही दिवस रात्र स्वप्नें पाहतो. पण अद्यापपर्यंत एकाही स्वप्नांतील एकही गोष्ट कधी खरी झालेली नाहीं. मग यावर विश्वास कसा बसावा ?

**श्री. कृ. रा. देवळेकर** ( मुंबई )

**प्रश्न—जगांत पुरुष नसते तर स्त्रियांनीं या पृथ्वीवर स्वर्ग निर्माण केला असता हें माझ्या एका मैत्रिणीचें म्हणणें तुम्हास पटतें काय ?**

**उत्तर**—स्त्रियांचा नेम नाहीं. त्या मनांत आणतील तें करू शकतील. पण शंका एवढीच कीं जेथें देवांची वस्ती नाहीं त्याला स्वर्ग हें नांव कसें देता येईल ?

—आणि समजा स्त्रियानीं पृथ्वीवर स्वर्ग निर्माण केला तरी तो एकदा पुरुषाना दारु-बिल्याशिवाय त्याना स्वास्थ्य मिळणार नाहीं; आणि मग त्या सर्वच स्वर्गकर्त्या, पुरुषाना हुडकण्यासाठीं त्रिभुवन पालथे घालणार नाहींत कशावरुन ?

**श्री. यशवंत केळकर** ( कल्याण )

**प्रश्न—हिंदी चित्रपटाचा अधःपात लौकरच होणार असल्याची चिन्हें दिसत आहेत; अशावेळीं वाङ्मयानें समृद्ध असलेल्या मराठी भाषिकांनीं एकदम चढाई करून हिंदी चित्रपट-संस्था व्यापण्यास वाव नाहीं का ?**

**उत्तर**—चित्रपट धंद्यांत चढाईसाठीं फक्त पैशाचे शस्त्र असावे लागते आणि आपण मराठी माणसें तिथेंच कमी पडतो.

• • •

( पान ४९ वरून चालू )

आतां ते समोर आले तेव्हां त्यांच्या डोळ्यांवर एक जाड काड्यांचा चष्मा लावलेला होता. मला त्यांनीं दुसऱ्या बाजूला पाहाण्यास सांगितल्यामुळं त्यांचं चित्रण दिसणं शक्यच नव्हतं. 'स्टेडी प्लीज' म्हणून सांगितल्यावर मीं श्वास रोखून ताठ बसलों. ऑपरेशन करतांना रोग्याची जी अवस्था असते तशी माझी झाली होती. मला रंग फरफटण्याचे, तसेंच कलेच्या हत्याराचे आवाज फक्त ऐकूं येत होते. थोड्या वेळानं घोडा सरकवल्याचा आवाच ऐकूं आला त्याच वेळीं मी मान हलवली. प्रेक्षक चित्राभंवतीं गर्दी करून उभे होते. माझं अंग आंबून आलं होतं, पायाला मुंग्या आल्या होत्या. त्यामुळं मला हालणं शक्यच नव्हतं. तरीसुद्धां माझं चित्र पाहाण्याची माझी इच्छा मला स्वस्थ बसूं देईना. मीं तसाच लंगडत लचकत त्या गर्दींत घुसलों. मला पाहातांच तिथल्या एक दोन स्त्रिया माझ्याकडे चमत्कारिकपणं पाहात दूर सरल्या, त्यामुळं मीं जास्तच गोंधळलों. अखेर चित्रापर्यंत पोहोंचतांच माझ्या रंगवलेल्या प्रतिकृतीकडे पाहतांच माझ्या डोक्यांत काजवेच चमकले. जगांतल्या सर्व कुरूपतेचं साक्षात् दर्शन मला झालं होतं. क्षणांत हातांच्या धनुकल्यावर शिर घेऊन लढणारा मी योद्धा दिसत होतों. तर दुसऱ्या क्षणीं पायांच्या फेंगडेपणामुळें कथ्थक नृत्यकाराचा आभास होत होता; चेहेरा अष्टवक्र; शिवाय अर्धवट कोड उठल्यासारखा, डोळ्यांची बुबुळं बटबटीत आणि गालांवर सरकलेलीं, नाक कंपासासारखं, दातांची कवळी गोरिलासारखी आणि एकंदर देह 'मनुष्याचं शरीर म्हणजे घाणीचं आगर' छाप बनवलेला. माझा माझ्या रूपाबद्दलचा अभिमान केव्हांच नाहींसा झाला होता. मीं संतापानं चित्रावर हल्ला करणार होतो इतक्यांत त्या कलावंतानं मला मागं खेचलं व आपला चष्मा मला बहाल केला. तो लावतांच मला एकदम दिव्यदृष्टि प्राप्त झाली, माझा राग हळूहळू ओसरूं लागला. त्या चष्म्याच्या रंगीत काचा प्रात्यक्षिकापूर्वीं कलावंतानं तडे जातील इतपत फोडल्या होत्या. समोरचे प्रेक्षक त्या चष्म्यांतून मला माझ्या चित्रासारखेच विस्कळीतपणं जोडलेले दिसत होते. अखेर त्या चष्म्यांतून मीं मोठ्या आदरानं त्या स्वतंत्र प्रज्ञेच्या कलावंताकडं बघितलं आणि त्या क्षणीं एका नवकलेच्या रसिक प्रेक्षकाला खरा नवचित्रकार दिसला.

• • •

---

### योग्य उपयोग !

कामाचे दोन आठवडे गेल्यानंतर एक मजूर आपल्या मुकादमाकडे गेला व त्याला म्हणाला, "अजून मला फावडं मिळालेलं नाहीं, मी काम कसं करायचं ?"

मुकादम म्हणाला, "कामाची काळजी तुला कशाला ? तुला तुझा पगार वेळेवर मिळतो आहे ना ? मग गप्प बैस तर !"

यावर मजुरानें उत्तर दिलें, "मी कामाची काळजी नाहीं करीत हो. माझं म्हणणं एवढंच आहे कीं, दिवसभर उभं राहून राहून माझे पाय दुखतात. इतर मजुरांसारखं मला फावड्याला टेकून आरामांत उभं रहातां येत नाहीं, म्हणून आपलं..."

---




- लोकप्रिय लोलिता
- केरळची शोकांतिका
- अप्रामाणिक प्रदर्शनें
- पुन्हां एकदां क्रिकेट
- बालवाङ्मयाची आबाळ
- संगीत सभा
- बालरंगभूमि
- आधी वजन वाढवा

## साहित्य

### लोकप्रिय 'लोलिता'

लोलिता कादंबरीच्या लोकप्रियतेनें अश्लीलता ही लोकमान्य आणि अर्थोत्पादक ठरली आहे. अर्थात् लोलिता कादंबरींत सर्व सामान्य वाचकांची अश्लील वाङ्मयाची उत्सुकता भागवील असें कांहींच नाहीं. उलट यापेक्षां कांहीं इटालीयन आणि फ्रेंच लेखक लोलितापेक्षां अति अश्लील आहेत. लोलिता ही मनोविकृतीची कहाणी आहे. अर्थात् त्यामुळें तिला विकृत कहाणी म्हणावं कीं नाहीं हा निराळाच प्रश्न आहे. पण लोलिता कादंबरी ज्या युरोपियन ललित वाङ्मयाचें प्रातिनिधित्व करते त्या वाङ्मयाची सध्याची प्रवृत्ति लोलितावरुन स्पष्ट होते. मनोविकृतीच्या चित्रणाच्या ऐसपैस नांवाखालीं पाश्चिमात्य वाङ्मयांत अश्लीलतेनें तर अढळ स्थान मिळविलें आहे. पाश्चात्य संस्कृतीच यंत्रबद्ध जीवनामुळें अशी मूल्यहीन आणि अधःपतित झाल्यामुळें त्याचें प्रतिबिंब वाङ्मयांत पडणें अपरिहार्य आहे असाहि एक पक्ष मांडला जातो. पण या प्रवृत्तीविरुद्ध तितकीच जोराची प्रतिक्रिया होऊ लागली आहे हें निर्विवाद. त्यामुळें एडमंड फुल्लरसारखा टीकाकार आधुनिक वाङ्मयांतील लैंगिक जीवनाच्या चित्रणाबाबत टीका करतांना म्हणतो—The writers whom I decry know nothing of sex in the context of actual love but know only sterile qrapplings of loveless passion, a very different thing from passionate love. वाङ्मयांतील अश्लीलतेबाबत सेन्सॉरशिप किंवा सरकारी नियंत्रणाचा कांहींच उपयोग नसून—'Disdain, on the part of the public for the sick and the silly in sexual portrait is the best remedy for the present excess." असे उद्गार त्यानें काढले आहेत. पण फुल्लर सारख्या सोंवळ्या टीकाकाराला फारसें कुणी जुमानीत नाहीसें झाले आहे. अश्लील वर्णनांनीं युक्त अशा ललितवाङ्मयाची लोकप्रियता दिवसेंदिवस बेसुमार वाढत आहे. वुमन ऑफ रोम, गॉडस् लिटल एकर, चॉकोलेटस् फॉर ब्रेकफास्ट, लेडी चॅटर्लीज लव्हर (नवी आवृत्ति) या कादंबऱ्यांची लोकप्रियता मुळींच थंडावलेली नाहीं.

यामुळें तुलनेनें आमचे नवकथाकार तर फारच सोवळे वाटायला लागतात. पण गेले कांहीं महिने वाङ्मयीन आघाडीवर 'सारं कसं शांत शांत' असल्यामुळें एखाद्या नव्या दमाच्या लेखकाला 'लोलिता'ची नशा चढली तर नकळे! तोपर्यंत आमच्या अश्लीलमार्तंडाना चिवडायला येते दिवाळी अंक आहेतच.

### बालवाङ्मयाची आबाळ

मराठींत बालवाङ्मयाची आबाळ चालू आहे अशी ओरड बरेच दिवस कानीं ऐकूं येत होती. जून महिन्यांत प्रसिद्ध झालेला साधना साप्ताहिकाचा कुमार विशेषांक पाहून ही ओरड सार्थ असल्याची सत्यता पटली. कुमारांना पटेल रुचेल, असें या अंकांत कांहींच नाहीं हे त्याचें वैशिष्ट्य. बालवाङ्मयासाठीं या अंकांत बड्या बड्या लेखक मंडळींची हजेरी लागली आहे. पण या सर्व बड्या लोकांना लिहिण्याच्या भरांत आपण कुणासाठीं लिहित आहोंत याचें भानच राहिलें नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट! बड्या मंडळींच्या लेखनाचा दर्जा निःसंशय चांगला आहे, पण बालवाङ्मय या दृष्टीकोनांतून ही सर्व मंडळी सपशेल 'कोलमंडली' आहेत. कुमारांसाठीं लिहिलेल्या वाङ्मयांत कुमारच कथाविषय असलें पाहिजेत असा आमच्या 'बाल–लेखकांचा' कटाक्ष आहे. पण 'टाम सेयर' सारखी कलाकृति निर्माण करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें आमचें 'चंदु–बंडू' हे कथानायक केव्हांच विस्मृतींत गडप झाले. ग्रिम, अँडरसनच्या तोडीचा एकहि प्रतिभासंपन्न बालकथाकार कोणत्याच देशी भाषेंत नाहीं. अजूनहि आमचे बालवाचक परकी कथांच्या भाषांतरावर आणि अरबीभाषेंतील सुरस कथावर आपली भूक भागवित आहे. आमच्या बालांसाठीं नाट्यनिर्मिती झाली तीहि एका इंग्रजी कथेवर. जादूचा वेल, अल्लाउद्दीन, अलीबाबा, सिंदबाद यांच्या पलीकडे आम्ही अजून जाऊं शकत नाहीं. वास्तविक पाहातां बृहत्कथासार, पंचतंत्र यासारख्या देशी भांडाराचे आधुनिकीकरण करण्याची आतां वेळ आली आहे. पण आमच्याकडे या विभागाकडे प्रकाशक आणि साहित्यिक फारशा उत्साहानें लक्ष देत नाहींत. मराठी

अनुक्रमणिका

नियतकालिकांतील बालविभाग हा एक थट्टेचा विषय झाला आहे. त्यामुळें चांदोबासारखें हीन दर्जाचें बालमासिक मुलांच्या हातीं जात आहे आणि उत्तम वाङ्मयाभावीं भुकेलेलीं मुलें तें रटाळ वाङ्मय अधाशासारखें वाचीत आहेत. सारांश मराठीतील बालवाङ्मय हा एक पोरखेळ झालेला आहे. इंग्रजी भाषेंतील बालवाङ्मयाचा चित्रविचित्र, रंगीबेरंगी अद्भुरम्य प्रपंच पाहून डोळ्यांचे पारणें फिटतें आणि त्यांच्या मुलांच्या भाग्याचा हेवा वाटतो आणि म्हणून साधनेसारख्या प्रतिष्ठित साप्ताहिकाचा वर्षांतील हा एकुलता एक पण नीरस, बेचव आणि रुचिहीन प्रयत्न पाहून खेद होतो. अर्थात् कांहींच नाहीं अशा परिस्थितींत साधनेचा हा 'दर्जेदार' प्रयत्न स्वागतार्ह आहे. बालवाङ्मयाची आबाळ थांबविण्याचे कांहींतरी संघटित प्रयत्न झाले पाहिजेत.

—पिनाकि




## केरळची शोकांतिका

भारतीय राजकारणांतील गेल्या महिन्यांतील महत्त्वपूर्ण घटना म्हणजे केरळ मधील कम्युनिस्ट राजवटीचे उच्चाटन. नाहीं होय नाहीं होय करीत मध्य सरकारनें शेवटीं हस्तक्षेप करून केरळ मधून कम्युनिस्ट मंत्री मंडळाची उचलबांगडी केली. या बाबत मध्यवर्ति सरकारला सादर केलेल्या आपल्या अहवालांत केरळचे राज्यपाल डॉ. बी. रामकृष्णराव म्हणतात 'शासन भ्रष्टतेसंबंधीं व लोकशाहीच्या विटंबनेसंबंधीं केरळ शासनावर जे आरोप करण्यांत आले आहेत ते खरे आहेत आणि सरकारनें बहुसंख्य जनतेचा पाठिंबा गमावला आहे अशी माझी खात्री झाली आहे—" मध्यवर्ति सरकारनें आपल्या निवेदनांत आपण राज्यपालांच्या अहवालाला अनुसरूनच ही घोषणा केली अशी मखलाशी केली आहे. केरळमधील या हस्तक्षेपाबाबतची पार्लमेंटमधील प्रतिक्रिया संमिश्र स्वरूपाची आहे. फिरोज गांधींनी आपल्या तडफदार भाषणांत या कालखंडांत केरळ कॉंग्रेसजनांनीं तेथील जातीयवाद्यांशीं जी हातमिळवणी केली तिचा कडाडून निषेध केला. महावीर त्यागींनीं तर मध्यवर्ति सरकारच्या हस्तक्षेपाचा निषेध केला आणि त्याचबरोबर स्थानबद्धता कायद्याची अंमलबजावणी न केल्याबद्दल केरळ सरकारची प्रशंसा केली. या संदर्भांत प. बंगाल सरकारनें नुकतीच जी कम्युनिस्ट नेत्यांची धरपकड केली तिचें समर्थन करणें कॉंग्रेस पक्षाला जड जावें. अर्थात् अपेक्षेप्रमाणें कम्युनिस्ट खासदार कॉ. डांगे यांनीं लोकसभेंत सरकारवर प्रखर टीका केली.

पण केरळची ही शोकांतिका खरी कम्युनिस्टांची नसून कॉंग्रेसचीच आहे असें कोणत्याहि समंजस माणसाला पटेल. गेल्या निवडणुकींत कॉंग्रेसचा पराभव कां झाला तर कॉंग्रेस आणि जनता यांच्यात अंतर निर्माण झालें. त्यावेळीं स्वार्थत्यागी कार्यकर्त्यांनीं जनतेंत आपलेपणानें मिसळावें अशी भाषा बोलली गेली. अर्थात सत्तेला चटावलेल्या केरळमधील कॉंग्रेस पुढाऱ्यांकडून हें होणें अशक्य अशी रास्त शंका कांहीं लोकांनीं व्यक्त केली. याबाबत वरिष्ठ कॉंग्रेस पुढाऱ्यानींहि नवीं माणसें, नवे कार्यकर्ते शोधण्याचे यत्न केले नाहीं आणि सत्तालोलुप कॉंग्रेस कार्यकर्त्यांना सत्तेच्या वेडापायीं निर्लज्जपणें प्रतिगामी शक्तींशी समजोता करण्यास अवसर दिला. या प्रतिगामी शक्तीपाशीं फक्त अमाप पैसा होता. यामुळें केरळची ही साथ इतर प्रांतातहि भडकेल कीं काय याचें भय वाटतें. कारण आज कॉंग्रेस ज्या तत्त्वज्ञानाचा प्रचार करते त्या तत्त्वज्ञानाची अंमलबजावणीबाबत उदासीन राहते हीच यांतील खरी शोकांतिका आहे.

— विष्णुशर्मा

## सत्यं.शिवं.सुंदरम्

## संगीत सभा

गिरगांवांत आतां पूर्वींसारख्या 'संगीत सभा' राहिल्या नाहींत. गेल्या चौदा-पंधरा वर्षांपूर्वी शनिबारी रात्रीं दहा वाजायच्या सुमारास सहज फेरफटका मारणाऱ्याला, जिथें जिथें सभागृह असेल तिथल्या फुटपाथवर उभें राहिल्यास गायन वादनाचे सूर कानावर आदळायचे हें ठरलेलेंच होतें. युद्धपूर्वकाळीं आणि ऐन युद्धकालांत अनेक संगीत सभांचे बोर्ड कुठें ना कुठें लटकलेलेच दिसायचे. कालांतरानें यांतल्या बहुतेक संस्था बंद झाल्या, पण बोर्ड कांहीं काढले गेले नव्हते. महापालिकेच्या जबर कर आकारणीमुळें तेही थोड्या दिवसांनी गडप झाले. संगीतकलेबद्दल आस्था आणि तिची जोपासना करण्याची तळमळ ज्यांच्यांत होती, अशा कांहीं ध्येयवादी लोकांनी या संस्था स्थापन केल्या होत्या. तशीच कळकळ असलेले लोक या संस्थाना निःस्वार्थीपणें मदत करीत असत; परंतु कांहीं व्यवहारधूर्तांनीं फायद्याच्या अभिलाषेनं डाव रचून नव्या संस्था जन्माला घातल्या. कांहीं बाजारबुणग्यांना हाताशीं धरून संगीताचा व्यापार सुरू केला. आणि त्यामुळें जी स्पर्धा निर्माण झाली त्या संघर्षांत नव्यांबरोबर जुन्या आणि ध्येयवादी संस्थानांही समाविष्ट व्हावें लागलें. ठराविक रसिक आणि जाणित्या श्रोत्यांसाठींच असलेल्या आणि त्या श्रोत्यानींच जगवलेल्या या संस्थांचें, चालकांनी स्वार्थबुद्धिनें 'पब्लिक' साठीं असें रूपांतर केल्यानें गोंधळ निर्माण झाला, ख्याल, अस्तायांत ठुंबऱ्या हव्याशा वाटूं लागल्या, त्यांतच गीतेंही हवीशीं वाटूं लागली. नंतर 'लाइट म्युझिक' चा अंतर्भाव झाला. 'पब्लिक टेस्ट' ही एक नवी डोकेंदुखी संगीत सभेच्या चालकांना लागली. आणि या साऱ्या गोंधळांत अभिजात अभिरुची काळाच्या उदरांत गडप झाली.

आज या घटकेलां मुंबईत ज्या कांहीं मोजक्याच 'संगीतसभा' तग धरून आहेत त्यांत 'सांताक्रूज म्यूझिक सर्कल' 'दादर माटुंगा म्यूझिक सर्कल' 'रुपायतन' आणि 'अलंकार' या संस्था अधून मधून जागृति दर्शवतात. 'विलेपार्ले म्यूझिक सर्कल' ही नवी संस्था गेल्या वर्षी सुरू झाली. आतांपर्यंत त्यानींहीं चांगला आदर्श डोळ्यासमोर ठेवलेला आहे. गेल्या पंधरवड्यांत विलेपार्ले म्यूझिक सर्कलनें' पंडित रविशंकर यांचा सतारवादनाचा कार्यक्रम सादर केला. पंडितजीनीं याप्रसंगीं 'भिमपलास' 'मिश्रपिलू' 'मिया मल्हार' 'मेघ' 'इत्यादी हातखंडे राग तर वाजवलेच परंतू 'दुर्गकेशी' नांवाचा नव्या पिढीला तरी नवा असा—एक राग वाजवला. ऋषभ, पंचम विरहीत कोमल निषाद आणि दोन्ही गांधारांची आस ठेऊन–साधारण दाक्षिणात्य पद्धतीची झांक असलेला हा राग–पंडितजीनीं अपूर्व तयारीनें वाजवला. दाक्षिणात्य पद्ध-





तीच्या कांहीं रागांचें आपल्या संगीत पद्धतींत विलीनीकरण करून पंडित रविशंकरानीं मोठें कार्य केलेलें आहे. 'वाचस्पति' हा रागही त्यांनींच ज्यास्त प्रचारांत आणला.

'अलंकार' ही संस्था महिन्यांतून दोन वेळां कार्यक्रम सादर करते. आतां पर्यंत तिनें अनेक अभिनव असे कार्यक्रम सादर केलेले आहेत. कांहीं दिवसांपूर्वी, कानपूर कॉलेजांतील विद्वान आणि रसिक प्राध्यापक श्री. वृहस्पतिजी यांना बोलवून संगीत या विषयावर त्यांची अनेक सप्रयोग व्याख्यानें 'अलंकारनें' सादर केलीं. त्यांतल्या एका व्याख्यानांत त्यानीं 'जती-गान' हा वेदकालीन संगीत प्रकार कोणत्या स्वरुपाचा होता यावर विवेचन केलें. त्यांची साथ त्यांचे शिष्य "गुलाम मुस्तफा" यानीं केली होती. हा कार्यक्रम वैशिष्ट्यपूर्ण असा झाला. याचदिवशीं 'गुलाम मुस्तफांचा स्वतंत्र असा एक कार्यक्रम झाला; परंतु तो परिणामकारक असा झाला नाहीं. त्यांनी गायलेला मालकंस थोडासा उथळ वाटला. ठुंबरीही रंगली नाहीं. त्याच्या पुढच्या वेळीं अलंकारनें "भीमसेन जोशी" यांच्या गायनाचा कार्यक्रम सादर केला. बरहुकूम रंगणारे भिमसेन यावेळीं तितकेसे रंगले नाहींत. सुरवातीचा 'पूर्या' मंद्रसप्तकांत जेवढ्या परिणामकारकतेनें विस्तारला जात होता तेवढा तो तार साप्तकांत विस्तारला गेला नाहीं. तार सप्तकांत त्याला वारंवार सोहोनीची छटा येत होती. आवाजाच्या कोतेपणामुळें असेल कदाचित, जोशीबुवा तार सप्तकांतल्या ऋषभापर्यंतच स्वच्छ स्वर लावत होते; पण गांधार मध्यमांत ते फक्त हात वारेच करत होते. त्यामुळें आजची त्यांची बैठक अपेक्षा होती तशी ती रंगली नाहीं. पुरब पद्धतीची ठुमरी तर अगदींच किरकोळ वाटली. परवांचा "अबीदहुसेन जंजिरावाले" यांचा अलंकारानें खूप जाहितात करून सादर केलेला कार्यक्रमही यथातथाच झाला. या संस्थानी गायकानें गायनांतल्या रसांची देवाण-घेवाण कशी असते हें अजमाविण्याचा कधीं प्रयत्नच केलेला दिसत नाहीं. असो !

पुण्यतिथ्यां निमित्त होणाऱ्या गायन वादनानाही आतां सुरुवात झालेली आहे. मा. नवरंग यांच्या विद्यालयानें परंपरेप्रमाणें गुरुवर्य विष्णु दिगंबर पलुस्करांची पुण्यतिथी १५ ऑगस्ट रोजीं साजरी केली. गांधर्व महाविद्यालयाच्या परंपरेनें विद्यालयें चालवणारे इतरही याच महिन्यांत त्यांची पुण्यतिथी साजरी करतात.

### अप्रामाणिक प्रदर्शनें

आपलें चित्र वार्षिक प्रदर्शनात नुसतें मांडलें गेलें याबद्दलची केवढीमोठी धन्यता चित्रकाराला वाटे ! बक्षिस बाजूलाच राहो; परंतु परीक्षकांकडून प्रदर्शनांत केवळ टांगलें जाण्याबद्दल त्याची निवड झाली आहे, एवढी कुणकुण जरी ऐकली तरी कृतकृत्य झाल्याचा आनंद चित्रकाराला होई, श्रमसाफल्याचा निश्वास सोडला जाई ! प्रदर्शनात पाठवायच्या चित्राची केवढी तयारी करावी लागे. विषय, मांडणी, रंगसंगती यावर तज्ञांकडून-वारंवार विचार विनिमय करून, सल्ला घेऊन मगच तें चित्र प्रदर्शनासाठीं पाठवलें जाई. आजची परिस्थिति तशी राहिलेली नाहीं. वेगानें धावणाऱ्या कालप्रवाहांत कलावंतही पार बदलून गेलेला आहे. संपूर्ण व्यवहारी दृष्टीला तोही पारखा झालेला नाहीं. अर्थशून्य असें कांहीं केलें आणि परिक्षकांकडून तें परत आलें तर याचें दुःख न मानतां आपलें स्वतःचें, वेगळें असें एकहाती प्रदर्शन तो स्वखर्चानें मांडूं शकतो. चालू जमान्यांत दैवबलानें कदाचित तो त्यांत यशस्वी होतोही !

"बॉम्बे आर्ट सोसायटीचें" केवळ सोसायटीच्या लहान मोठ्या आश्रयदात्यांचें असें

---

( पान ४३ वरून चालू )

साऱ्या अंगीं देवाबद्दल खरी श्रद्धा आहे, असं मी म्हणणारच नाहीं. त्यापेक्षां क्षणभरच देवाचं चिंतन मनापासून केलं, तर त्याला कितीतरी महत्त्व आहे. ज्याचं मन हलक्या दर्जाचं आहे, त्यानं देवाची कितीहि भक्ति केली तरी ती त्याच्या अंतःकरणांत भिनलेली नसते.

उ. ४—माझ्या जीवनांत मला अनेक दैवी अनुभव आले आहेत. माझी ईश्वरावर श्रद्धा आहे, म्हणून मी त्यांना 'दैवी अनुभव, म्हणते परंतु कुणाला ते कदाचित योगायोगहि वाटतील. पण मी तसं म्हणूं शकत नाहीं.

उ. ५—नाहीं.

## बाबूराव बागवे

मराठी नियतकालिकांचे खरेखुरे आधारस्तंभ आणि सूत्रधार. बागवे साहित्यिक नसले तरी साहित्याशीं एवढा 'घनिष्ठ' संबंध असलेली दुसरी व्यक्ति सांपडणें कठिण.

१—परमेश्वरावर माझी जरूर श्रद्धा आहे. माझ्या छोट्याशा धंद्यांतसुद्धां सुसूत्रता राखण्यासाठीं धंदाप्रमुखाची आवश्यकता आहे तर मग ह्या अवाढव्य विश्वाचा व्यापार व्यवस्थित चालविण्यासाठीं कोणीतरी हवाच ना ? आपल्या भारतांतील रेल्वेचा कारभार एकसूत्र करण्यासाठीं रेल्वेमंत्री आहेत. तरीही रेल्वेवर किती दुर्घटना घडतात तें आपण वाचतोच. मग जर ह्या विश्वाचा कोणी नियंता आणि तोही Compitant नसेल तर मग बोऱ्याच वाजायचा !



२-३—धर्मावर विश्वास ! पण धर्म म्हणजे काय ? रुद्राक्षाच्या माळा, गंध, पूजाअर्चा करायची व गरिबांचा गळा कापायचा यांत धर्म कुठला ? धर्माचं अवडंबर माजवून अधर्म करण्यापेक्षां आपला व्यवसाय इमानेइतबारे करणें, आपल्या संबंधीतांशीं इमानेइतबारे वागणें हाच धर्म, मी ह्या धर्माचं पालन करतो ! ह्या धर्माचं कोणतंच पुस्तक नाहीं. तेव्हां तें वाचण्याचा प्रश्नच येत नाहीं.

४—नाहीं.

५—प्रत्येकानें आपापलीं कामें इमानेइतबारे करावींत. तेंच परमेश्वरास आवडतें.

• • •

अनुक्रमणिका

एक प्रदर्शन गेल्या पंधरवड्यांत जहांगिर आर्ट गॅलरींत भरलें होतें. एकंदर १८७ चित्रकृतींचें हें प्रदर्शन पाहून झाल्यावर, आपण पाहिलें तें काय होतें ? असा प्रश्न प्रेक्षकाला पडल्यावांचून राहात नाहीं. कांहींतरी ओझरतें निसटून जावें तसें मनावर कांहींही परिणाम न होतां पाहिलेल्याचा विसरही लगेच पडतो हें त्यांतल्या त्यांत समाधान. या १८७ चित्रांत कांहीं जुनीं आहेत. कांहीं नवीन आहेत. जीं आहेत तीं ओढून काढल्यासारखीं वाटलीं. कर्तव्य म्हणून, प्रदर्शनाला कांहींतरी भरवणीला घातलेंच पाहिजे म्हणून जबरदस्तीच्या स्फूर्तिनें तयार झालेलीं वाटली. विद्यार्थी वर्गाच्या चित्रांत अभिव्यक्तीचा लवलेश आढळत नाहीं. तर कांहीं जुन्या जाणित्या चित्रकारांच्या चित्रांत जडत्व आलेलें दृष्टिगोचर व्हावें. अप्रामाणिकपणाही नजरेंतून सुटत नाहीं ! अवनीबाबूंची नक्कल म्हणून एक काष्ठशिल्प त्यांतल्यात्यांत बरें वाटलें.

मन्साराम पति-पत्नीचें दोन हाती प्रदर्शन शेजारच्याच हॉलमध्यें भरलेलें होतें. चित्रकलेच्या प्रांतांत अलीकडेच फोफावूं लागलेली ही जुगलबंदी बरीच लोकप्रिय झालेली आहे असें एकंदर प्रकारानीं वाटायला लागलेलें आहे. संगीत सृष्टींत रविशंकर पति-पत्नींनी सतारसरोदवर मध्यंतरीं थोडासा धुमाकुळ घातला होता. गाणाऱ्या पति-पत्नीची जुगल बंदी मात्र अजून ऐकिवांत नाहीं. असो ! श्री. मन्सारामनीं नुकतेंच चौथ्या बॉम्बेस्टेटच्या प्रदर्शनांस पहिलें बक्षिस मिळवलेलें ऐकिवांत होतें. तेव्हां त्यांची चित्रकला पाहायला आम्हीं उत्सुक होतों. परंतु सर्वस्वी निराशा झाली. बॉम्बे स्टेटच्या प्रदर्शनांत पहिल्या बक्षिसाचें मानकरी ठरलेलें चित्रही तेथें टांगलेलें होतें. त्या चित्राकडे पाहून आम्हीं थक्कच झालों ! ना मांडणी ना आलेखन ना रंगसंगती ! आशयाचा स्पष्टपणा कुठेंही जाणवत नव्हता. हें चित्र म्हणजे एक तकलुपी कृति वाटली. त्यांच्या एकंदर प्रदर्शनांत जिकडे तिकडे बनावटपणा फारच आढळला. तपस्येची झांक जराही आढळली नाहीं !

**बाल रंगभूमि**

श्री. सुधा करमरकर यांनीं 'लिटल् थिएटर' नांवाची एक लहान मुलांची नाट्यसंस्था स्थापन केलेली आहे. साहित्य संघाच्या मदतीनें त्यांनी सादर केलेलें 'मधुमंजिरी' हें नाटक यशस्वी झालेलें होतें. मुलांना तर तें फारच आवडलें होतें. त्यानंतर नुकत्याच झालेल्या संघाच्या नाट्यमहोत्सवांत त्यांनीं 'जादूचा वेल' नांवाचें दुसरें अद्‌भुत नाटक रंगभूमीवर आणलें, तेंहि गाजलें. त्या यशामुळेंच त्यांना ही स्फूर्ति झालेली असावी. लहान मुलांच्या नाट्यसंस्थेचा हा प्रयत्न कांहीं नवा नाहीं. शिरगोपीकरांच्या बालनटांच्या आनंद संगीत मंडळीनें साऱ्या महाराष्ट्रांत आपलें नांव गाजवलेलें आहे. त्यांची स्वतःची 'गोकुळचा चोर', 'गोव्याचा राणा', 'झांशीची राणी' हीं नाटकें अत्यंत गाजलीं. 'गोकुळचा चोर' नाटकाचे शेंकड्यांनीं प्रयोग झाले. त्यांतले 'ट्रिक सीन्स' आणि मुलांचीं कामें पाहून लोक तन्मय होत असत. शिरगोपीकरांनीं आपली संस्था खेडोपाडीं हिंडवली. त्यांच्याजवळ तंबू होता, वीज निर्माण करण्याचें मशीन होतें, ट्रक्स होते, त्यामुळें कुठल्याहि लहान सहान खेड्यांत त्यांना दौरे काढतां येत. फरक इतकाच, कीं शिरगोपीकरांचे विषय पौराणिक, ऐतिहासिक होते आणि सुधाताईनीं अद्‌भूततेवर ज्यास्त भर दिलेला आहे. संस्था चालवतांना जुन्यांना असलेल्या अनुभवाच्या गोष्टी त्यांनीं आपल्या संग्रहीं ठेवल्या पाहिजेत.

— गोपालन्

## क्रीडा

**पुन्हा एकदा क्रिकेट !**

क्रिकेटचा खेळ हा बेभरवशाचा असा त्याचा लौकिक. त्याचें भविष्य वर्तवूं नये; पारडें कधीं वरखालीं जाईल हें कोणी सांगू नये. असल्या अनिश्चिततेंच त्याची अर्धीअधिक गंमत असते; त्यांत थोडा जुगारी कैफ असतो. क्रिकेटचा हा पुराणा लौकिक यंदा हिंदी संघानें पाहातां पाहातां खोटा करून दाखवला—आणि तोहि इंग्लंडांत, क्रिकेटच्या भर माहेर घरीं ! हिंदी संघाची या मोसमातील एकंदर कर्तबगारी सुसंगत झाली; कांहीं अनपेक्षित घडलें नाहीं; धक्काबिक्का मिळाला नाहीं. दौऱ्याच्या आरंभीं झालें तेंच निर्धारानें शेवटपर्यंत होत राहिलें आहे. कुडमुड्या वृत्तलेखकांनीं होरारत्नाचा आव

आणून जें दुर्भाग्य केव्हांच मांडून दाखविलें तें पुरें फळफळलें. भरंवशाच्या म्हशीला टोणगा झाला नाहीं, पारडीच झाली.

कसोटी सामन्यांत हिंदुस्थाननें हार खाल्ली ती अगदीं पद्धशीरपणें आणि संकोच न ठेवतां. पुऱ्या डावानें मार खावयाचा की दीडदोनशें धांवांनी इतक्यापुरताच विकल्प. पंचवीस वर्षांपूर्वीची कथा आहे. दक्षिण आफ्रिकेच्या कॅमेरॉन या दणक्या खेळाडूनें इंग्लंडच्या व्हेरिटी या प्रसिद्ध बोलरची एक ( ओव्हर ) अशी बेदूम चोपली, कीं प्रत्येक चेंडूला चारचा किंवा सहाचा फटका. हा धडाका संपल्यावर व्हेरिटीजवळ जाऊन तो म्हणाला "खरं सांगूं, गड्या, तुझ्या प्रत्येक चेंडूनें मनाची चलविचल झाली—तो चारला हाणूं कीं सहाला !" इंग्लंडचें यंदा तसेंच कांहीं झालें असणार. रांगेनें पहिले तीन कसोटी सामने ( आणि यंदाचा 'सट' ) हिंदुस्थान हरला; वाटलें आतां तरी पराभवाच्या भीतीनें विचकत न खेळतां हा संघ बेगुमानपणें खेळेल आणि थोडें पाणी दाखवील. पण तें वाटणेंहि भाबडें ठरलें. तोच कचखाऊ खेळ, तीच डरपोक वृत्ति. बॅटीनें बॉल चोपण्याऐवजी बॉल बॅटवर कसा आपटतो इकडे अवघें लक्ष; बॉलचें कातडें ( आणि भावना ) न दुखवतां खेळायचें. असा हा अहिंसक खेळ !

क्षेत्र रक्षणाबाबत काय पुसावें ? त्यांत तर आपली परंपरा गाजलेली आहे; आणि यंदा तिला तडा गेला नाहींच, उलट ती थोडी अधिक बळकट झाली. झेल घेणें, चेंडू आडवणें वा त्याचा पाठलाग करणें, असल्या वरिष्ठ क्रिकेटमध्यें प्राथमिक मानल्या गेलेल्या क्रियांबाबत बहुतेक हिंदी खेळाडूंची वृत्ति अत्यंत अनाग्रही होती. परक्या प्रेक्षकांना याचा मोठा धक्का बसला म्हणतात. याला कारण त्यांच्या डोळ्यांना ती संवय नाहीं—आणि नाहीं म्हटलें तरी असल्या तपशीलांबाबतचा त्यांचा उगाच कडवा आग्रह असतो. वैऱ्यांला ( पुन्हां पुन्हां ) जीवदान देणें हेंच आम्हीं धर्मयुद्ध मानीत आलों. ही उदार आणि सहिष्णु वृत्ति जोपर्यंत आमच्या प्रतिपक्षांत बाणली नाहीं तोंपर्यंत असले सामने व्यर्थ आणि एकांगी.

हिंदी खेळाडूंना जलद बोलिंग विश्वासानें खेळतां येत नाहीं, त्याची भीतीच वाटते, याबद्दल दुमत नाहीं; पण त्यांना फिरकीची मंद बोलिंग लीलेनें खेळतां येतें. त्याला हवें तें पदचापल्य ( आणि लालित्य ) त्यांच्यात उपजतच असतें हा समज मात्र यंदा गैर ठरला. तेंच हवेबद्दल. यापूर्वीं जे चार हिंदी संघ विलायतेला गेले त्यांच्या असमाधानकारक कर्तृत्वाबद्दल तेथील पाऊस—गारठ्याला आम्ही बिनदिक्कत जबाबदार धरलें. यंदा आमच्यावरील हें छत्रहि हरवून आमची अब्रू पूर्ण उघडी पडायची होती जणूं. म्हणून कीं काय कधीं नव्हे इतका प्रसन्न आणि उबदार ऋतु यंदा विलायतेनें भोगला. आमचें कर्तृत्व मात्र पूर्वीपेक्षांहि दुबळें झालें; ऊन असो कीं पाऊस, आमची दुर्दशा तीच...तेथील लंगड्या संघांनीहि आम्हांला धूळ चारली. फार तर एखाद्या दुसऱ्या खेळाडूनें शर्थ करायची, आणि इतरांनी त्याला अपशकुन करायचा, हेंच पुन्हा पुन्हा झालें.

असल्या या हिंदी क्रिकेटचें भवितव्य काय ? जो तो यावर घसा अथवा लेखणी दुखळीत आहे...येथें त्याची चर्चा नको. ती पुन्हा कधींतरी. पण बंडूचें म्हणणें सांगावें—तो म्हणाला, "आम्ही क्रिकेटची साफ चेंडूफळी करून टाकली !"

— वारकरी

## विनाकारण

### आधी वजन वाढवा

अहमदाबाद येथें कॉलेजांत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थी-विद्यार्थिनींच्या आरोग्याबाबत गुजरात विद्यापीठानें प्रसिद्ध केलेल्या अहवालावरून विद्यार्थ्यांचें वजन दरसाल २·७ पौंडांनीं तर मुलींचें फक्त १·१ पौंडानेंच वाढतें असें दिसून आलें आहे. १३१६ मुली व ३१७१ विद्यार्थी यांच्या तपासणीनंतर हा निष्कर्ष निघाला. मुलींना अभ्यासाबरोबरच घरच्या कामाचीहि जबाबदारी संभाळावी लागते म्हणून त्यांचे वजन वाढत नाहीं असें कारण अहवालांत देण्यांत आलें आहे.

[ पान ५८ वरून चालू ]

या संग्रहांतील बहुतेक कथा सोज्वळ आहेत एवढंच ! पण त्यापलिकडे जाऊन पाहिलं तर पदरीं निराशा येते. आचाराचें सोडाच पण विचाराचें बंडहि यांतील नायक करूं शकत नाहींत. त्यांचें चित्रण अतिशय दुबळें आणि चेतनाहीन असल्यामुळें परिणामशून्य वटतें.

चांगलीं चित्रं रंगविणारे श्री. कानिटकर मार्मिक कथा लिहिण्याच्या बाबतींत असमर्थ ठरतात. एक 'अस्मान' कथा सोडली तर बाकीच्या कथा सामान्य वाटतात. या कथा वाचतानां कोणती एक गोष्ट प्रामुख्यानें जाणवत असेल तर ती म्हणजे बांधेसूदपणाचा अभाव. जिप्सी कथेचा शेवट जर निराळा झाला नसता तर तीहि एक चांगली कथा ठरली असती. तीच गोष्ट 'नास्तिक'ची.

कानिटकर हे एक चटकदार कथाकार आहेत. चमत्कृतिजन्य शेवट असणाऱ्या कथा लिहिण्याकडे त्यांचा कल आहे आणि हीच त्यांची मर्यादा.

— श्रीकृष्ण ठाकूर

## साहित्य स्वीकार

१ **पंचमी** (काव्यसंग्रह) सं.—भ. वा. अबोर
प्र. कवित्रय मंडळ,
सोलापूर.

२ **आप[illegible]** ले. रघुवीर सामंत,
B.A.B.T.
प्र.अमर ज्योति वाङ्मय
मुंबई १४.

३ **जयकेतू** ( नाटक ) सदानंद रेगे
पॉप्युलर बुक डेपो मुंबई

४ **टिळ दर्शन** ले. गोविंद तळवलकर
कॉंटिनेंटल प्रकाशन
पुणे. २

५ **चांदण्याची [illegible]ल** ( कथा ) ले. प्रा. सौ.
चारुशीला गुप्ते.
बा.ल. पाठक प्रकाशन
मुंबई २








गोष्टी असलेल्या गोष्टी — बाळ सामंत
सामाजिक स्टंटपट — मधु कर्णिक
जुनाच पर्वकाल — उमाकांत कीर
ए क ता री — श्रीकृष्ण ठाकूर

गोष्टी असलेल्या गोष्टी '

## चांदणें, मयूरपंख, हापूसचे आंबे

आजकाल घटनाप्रधान कथा लिहिणं कमतरीन मानलं जाऊं लागलं आहे. कथेंत रंजकता आली कीं ' चोखंदळ जाणत्या मान्यवर ' रसिकांच्या अंगाचा तिळपापड होतो. त्यांना असल्या कथांत कांहींच गवसत नाहीं. अशा रसिकांचा जागता पहारा असल्यामुळें कांहीं चतुर कथाकार थोडीशी शाब्दिक कसरत करून ग्रामीण पार्श्वभूमिचा, विक्षिप्त कल्पना आणि काव्यात्मतेचा भुलभुलैया निर्माण करून अशाच मान्यवरांचें प्रशस्तीपत्रक मिळवितात. सदानंद रेगे हे अशाच कथाकारांपैकीं एक. त्यांच्या मागील एका कथासंग्रहाबाबत त्यांनी वास्तवाची यथातथ्य प्रतीति देणारे, उपजत सौंदर्यदृष्टि आणि प्रयोगशीलता, ज्यांची एकहि कथा ' कोलमडली ' नाहीं असें दुर्मिळ यश मिळविणारे, इत्यादि प्रशस्तीपत्रकें मिळविलीं आहेत.

या सर्व प्रशस्तीपत्रकांच्या कसोटीला अर्थातच त्यांचा चांदणें हा कथासंग्रह उतरत नाहीं ही गोष्ट मात्र खरी ! कदाचित् याचा दोष रेग्यांच्या उत्साहि प्रकाशकाकडे जातो कीं काय नकळे ! ' मराठी नवकथेंतील कथा नाहींशी होत असल्याची रास्त तक्रार अलीकडे होऊं लागली आहे. अशा परिस्थितींत गोष्टी असलेल्या गोष्टी देतां आल्या तर आम्हांला पहावयाचें होतें.' अशी भलावण करून हा कथासंग्रह सादर करण्यांत आला आहे. त्यामुळें रेग्यांच्या सुमार गोष्टीच या संग्रहांत निवडल्या जाण्यांत रेग्यांच्या निवडीपेक्षां प्रकाशकाची आवड अधिक बलवत्तर ठरली असावी.

म्हणून ' चांदणें ' या कथासंग्रहाचें अपयश त्यांतील अत्यंत सुमार गोष्टीवेल्हाळपणांत आहे. घटनाप्रधान कथा लिहिणं सोपं आहे, असा कांही कथाकारांचा आणि टीकाकारांचाहि भाबडा गैरसमज आहे. वास्तविक पाहातां वाचकांची मति गुंग करून क्षणभर त्याला एखाद्या निराळ्याच अद्‌भुतरम्य वातावरणांत नेणाऱ्या लेखणीच्या मागें असामान्य प्रतिभेचा जादुगारच पाहिजे. इतक्या विलक्षण आणि उत्तुंग प्रतिभेचा कथाकार आजतरी मराठींत नाहींच नाहीं. त्यामुळें सामान्य चटकदार कथानकांचं आणि चुटक्यांचं मराठींत वारेमाप कौतुक होऊं लागलं आहे. ' चांदणं ' या कथासंग्रहांतील चांदणें, रेनकोट, सुनो मोरी पपीयरा या कथांत रेग्यांची काव्यात्मवृत्ति प्रतीत होते पण त्यामुळें या कथांना काव्यात्म कथा ही संज्ञाहि बहाल करतां येत नाहीं. उलट कांहीं वेळेस त्यांचें निसर्गवर्णन उपरें, जाणूनबुजून चिकटवलेलें असें वाटतें. रेग्याना अद्‌भुतरम्यतेचा, क्वचित् प्रसंगीं भीषणतेचाहि हव्यास आहे. सीझरचें रक्त, अश्वमेधाचा घोडा या कथा त्यादृष्टीनें वाचनीय असल्या तरी त्यांत रेग्यांच्या प्रतिभेची झेंप तोकडी पडली आहे त्यामुळें त्यांना यावी तशी रंगत आलेली नाहीं. रेग्यांची ग्रामीण वातावरणाशीहि सलगी असावी असें बागेसरीच्या द्रोणींत मिशा, दरोडा, प्रतिष्ठा या कथांवरून दिसतें. पण अलीकडे ग्रामीण कथाकारांत ऐकीव दंतकथा अगर आख्यायिका वाचकांच्या गळीं उतरविण्याची जी सांथ पसरली आहे त्याहून या कथांचें स्वरूप वेगळें वाटत नाहीं. त्यांतल्या त्यांत ' प्रतिष्ठा ' हीं कथा अधिक सरस आणि जिवंत वाटते.

रेगे आपल्या कथांतून मध्यमवर्गीयांची करुण कहाणी अंतर्भेदी स्वरुपांत मांडतात. या संग्रहांतील बॅट, रेनकोट, थडग्यांच्या आक्रोश, बातमी, वेत या कथांची धाटणी फार निराळी आहे. या विक्षिप्त कथांमागें अपार सहानुभूति दडलेली आहे. मला वाटतें जळतें दुःख अशा अलिप्त स्वरुपांत वेशीवर टांगण्याचें सामर्थ्य फार थोड्या लेखकांत असतें.

रेगे हुकमी आणि विपुल लेखन करतात. अशा लेखकांचा शेवटीं एक सांचा बनतो, आणि नवनिर्मितीचें नावीन्य ओसरतें. रेग्यांचें सामर्थ्य फार मोठं आहे. आणि अशा सामर्थ्यांची ते उधळपट्टी करतील तर त्यांचा ' मौजे 'तील ' माणूस ' होईल कीं काय असें भय वाटतें. मात्र ' चांदणें ' या कथासंग्रहानें मराठींत एका वाचनीय पुस्तकाची भर पडली आहे हें निश्चित !

सदानंद रेगे आणि शिरीष पै यांच्या प्रवृत्तींत बरेंच साम्य आढळते. रेग्यांप्रमाणें त्याहि विपुल आणि हुकमी लिहूं शकतात. त्यांचीहि वृत्ति बरीचशी काव्यात्म आहे. मात्र रेग्याकडे आढळणारी भावविवशता त्यांच्याकडे मुळींच नाहीं आणि विक्षिप्त कल्पनांचा हव्यास नाहींच नाहीं. ललितरम्य शैलींत कौटुंबिक कथा लिहिण्यांत त्यांनीं यश मिळविलें आहे हें निर्विवाद. जीवनासंबंधीचा त्यांचा आशावाद खंबीर आहे. अत्यंत घृणास्पद घटनांतून आणि व्यक्तींतून कांहींतरी चांगलें शोधण्याचा, दिग्दर्शित करण्याचा त्यांचा सतत प्रयत्न चालू असतो. बारकी, सर्वस्व, बकुळा हीं शब्दचित्रें वास्तवांतील आहेत आणि त्याचें भोळे भाबडे चित्रण त्यांनीं तन्मयतेनें केलें आहे. पण याहिपेक्षां या घटनांच्या आणि व्यक्तींच्या अंतरंगाचा ठाव घेण्याचा त्या यत्न करतील तर त्यांच्या कथेची उंची निसंशय वाढेल. शिरीष पै यांचें कथालेखन कोणत्याहि ' गटांत ' बसूं शकत नाहीं आणि कुणाचेंहि वेडेवांकडे अनुकरण करण्याचा त्यांनीं प्रयत्न केलेला नाहीं हें विशेष. या दृष्टीनें कथालेखनांतील त्यांची मर्दुमकी आतांपर्यंत एखाद्या धीट पण नवख्या, एकांड्या शिलेदाराप्रमाणें होती. हापूसचे आंबे आणि मयूर पंख या कथा संग्रहावरून एवढें मात्र निश्चित वाटतें कीं, त्यांची कथा आतां परिपक्व होण्याच्या मार्गावर आहे. तिला घाट येऊं लागला आहे. मात्र आतां तुला मी भेटणार नाहीं, कोंबडीचे जेवण, या सारख्या कथा लिहि-



अनुक्रमणिका

ण्याचा मोह टाळला पाहिजे. हापूसचे आंबे या संग्रहांतील चर्चेची घंटा, साधना या सारख्या 'तात्पर्यवजा गोष्टींचेहि दिवस आतां संपले आहुत. उलट हापूसचे आंबे, भेट, रहस्य या कथा वरच्या दर्जाच्या काहेत. आणि अशाच तऱ्हेच्या कथा लिहिण्यांत पै अधिक रंगतात.

आजपावेतों मराठींतील स्त्रीलेखिकांचें कौतुक त्याच्या लेखनगुणांपेक्षां टीकाकारांच्या स्त्रीदाक्षिण्यामुळेंच अधिक झालें. मराठींत आज विजया राजाध्यक्ष, सरिता परकी, यांच्या सारख्या स्त्री कथाकारांची जी नवी पिढी पुढें आली आहे त्यांनीं हें कौतुक स्वतःच्या गुणवत्तेमुळेंच मिळविलें. शिरीष पै या त्यांतील एक म्हणून त्यांच्यापासून याहून अधिक उत्तमोत्तम हृदयंगम कथांची अपेक्षा आहे.

**— बाळ सामंत**

**सामाजिक स्टंटपट**

## ओवाळणी

श्री. दीनानाथ लाटे यांचें ' ओवाळणी ' हें तिसरें नाटक ! ' भारताच्या स्वतंत्र्याचा लढा रोमहर्षक आहे ! या लढ्यांत लढलेल्या ज्ञात वीरांचें पोवाडेहि स्फूर्तिदायक आहेत ! आणि या लढ्यांत घरदार नोकरीधंदा सोडून उतरलेल्या असंख्य अज्ञात, सामान्य लढव्याचा त्याग, त्यांच्या उजाड झालेल्या घरांना आलेली अवकळा त्यांच्या कुटुंबियांची उडाउडालेली दैना, घरासाठीं त्यांनीं दिलेली झुंज हेहि तितकीच हृदयद्रावक आहे. याची छोटीशी एक झलक म्हणजे ' ओवाळणी ' नाटक ! ' असें लेखकानें प्रस्तावनेंत सांगितलें आहे. पण नाटक वाचल्यावर ही झलक कोठेंच दिसत नाहीं. लाटे यांच्याकडे संवादलेखनाची हुकमत आहे, पण एखाद्या सामाजिक स्टंट चित्रपटांत शोभण्यासारखे 'रोमहर्षक' प्रसंग खच्चून भरले आहेत. व्यभिचारी भाऊ, स्वार्थी संपादक, विक्षिप्त कवि हृदयी असा वेकार तरुण, प्रेम करणारी प्रौढ कुमारी, अपंग वडील—विनाकारण करारी आणि तिरसट असणारी आई, हा ठराविक मालमसाला त्यांनीं मुक्तहस्तें वापरला आहे. त्यांत किंकाळ्या आहेत, जिन्यावरून गडगडणें, ड्रे फुटणें, फोटो फ्रेममधून आवाज घुमणें, घड्याळाचा मॉंटॉज हे सर्व प्रकार आहेत. पण कशाचा केव्हां नीं कोठें संयमपूर्ण उपयोग करावा याचें लाटे यांना भान नाहीं. त्यामुळें हें नाटक वाचणें हें जितकें असह्य तितकेंच त्याचें प्रयोग पहाणें हें अशक्य ठरेल ! पण लेखकानें हें नाटक एका कुटुंबाचें ऋण फेडण्यासाठीं लिहिलें असल्यानें वाचक तरी बिचारा काय करणार ?

**—मधु कर्णिक**

**जुनाच पर्वकाल**

## पर्वकाल ये नवा !

वयाचीं साठ वर्षें पुरीं होत असतांना कवि यशवंत यांनीं आपला नवा संग्रह " पर्वकाल ये नवा " मराठी रसिकांच्या सुपूर्द केला आहे. या संग्रहांत पांच संगीतिका आहेत. संगीतिका या काव्यप्रकाराची चर्चा जरी येथें अनुस्युत नसली तरीपण येथें एवढें नमूद करून ठेवावेसें वाटतें कीं या प्रकारांत यशवंत उर्जस्वल यश मिळवूं शकलेले नाहींत ! संगीतिकांच्या प्रयोगमूल्यांचा विचार अर्थातच येथें अप्रस्तुत आहे.

श्री. विठ्ठलराव घाटे यांनीं स्वागतांत म्हटल्याप्रमाणें यशवंतांत खरोखरीच कांहीं बदल झालेला नाहीं. समवयस्क मुलें मोठे, निराळे कपडे वापरायला लागलीं तरी एकाद्या मुलानें बालपणींची कुंचीच घालून फिरावें, तसें कांहींसें त्यांच्या रचनेकडे पाहून वाटतें. घाटे म्हणतात त्याप्रमाणें यशवंतांची बैठक भक्कम आणि स्थिर आहे यांत शंकाच नाहीं. पण मला असें वाटतें कीं यशवंत त्या बैठकीवरून उठून पुढें आले असते तर तें वाजवी ठरलें असतें.

" प्रतापगड " या संगीतिकेंत [ यांत गद्य भाषणेंहि आहेत ] शिवाजीकृत अफझुलखानाच्या वधाची कथा आहे. पोवाड्याचा उपयोग मार्मिकपणें केला आहे. माकडाचें गोड काळिज खायची वांच्छा धरणाऱ्या सुसरीची मूर्ख कहाणी "सुसर आणि वानराचा पोर " या संगीतिकेंत आली आहे. यथा काष्टं च काष्टं च या सुभाषिताचा आश्रय घेऊन उभारलेली " जीवित–नौका " ही संगीतिका आणि ' देव्हाऱ्यांतिल नाणें ' ही संगीतिका एका मर्यादित प्रमाणांत आशयघन वाटल्या. आणि संग्रहाचें नांव धारण करणारी " पर्वकाल ये नवा " ही संगीतिका अगदींच साधी आहे. यशोधन, यशोगंध लिहिणाऱ्या यशवंताचें या संग्रहांत कुठेंच दर्शन घडत नाहीं.

तिरकस आशयाच्या आणि अस्पष्ट अभिव्यक्तीच्या रचनांची अपेक्षा कुणी यशवंतांकडून करणार नाहीं. तथापि आजच्या कवितेंत जे झपाट्यानें बदल घडत आहेत त्यांची दखल यशवंतांनी घेतलेली दिसत नाहीं. रविकिरणमंडळांतला कवि आज जनमनावर मोहिनी घालूं शकत नाहीं हें निर्विवाद सत्य होय ! यशवंतांची आ ई अ जू न आ म्ही वि स र त ना हीं. जाहीर काव्यगायनाची प्रथा महाराष्ट्रांत प्रथम पाडण्याचें श्रेयहि यशवंतांकडेच जातें. त्यांच्याच ओळी उचलून असें म्हणतां येईल कीं

जरि चलन अतां हें नुरलें व्यवहारांत
हें स्थान निरंतर तयास देव्हाऱ्यांत !

या संगीतिकांना निर्मितीव्रतत रंग-सूचना देण्याचें काम सुप्रसिद्ध दिग्दर्शक प्रा. भालबा केळकर यांनी मोठ्या चातुर्यानें पार पाडलें आहे. या संगीतिकांना जर कांहीं वजन आलें असेल तर तें या रंग-सूचनामुळेंच असें म्हणावेसें वाटतें. एरवीं हा संग्रह वाचून नव्या पर्वकाळाचें दर्शन घडलें असतें तर विशेष समाधान वाटलें असतें !

**—उमाकान्त कीर**

**" एकतारी "**

## चंदनाची वीणा

चंदनाची वीणा मधील कथा घटनाप्रधान आहेत. त्याचें फडके, महादेवशास्त्री जोशी यांच्या शैलीशीं जवळचें नातं असल्याचा प्रत्यय येतो ! तरीहि अंतर्मुख बनून मानवी मनाचें सूक्ष्म चित्रण करण्याची ताकद कानिटकरांकडे आहे याची प्रचीति मधून मधून येते.

( पान ५६ वर चालू )

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.

REGD. No. B-7640

भारतीय शेती



# भारतीय निर्मित किर्लोस्कर एंजिन घेण्यामुळेंच मला मनःशांती लाभली !

— श्री. सुरवसे



आकोले (काटी)
ता. १२-३-५९

मे. किर्लोस्कर ऑईल एंजिन्स, लि.
पुणें ३

सप्रेम नमस्कार,

मी आपले सोलापूर येथील एजंट मे. मुरलीधर मारुती आणि सन्स यांचेकडून किर्लोस्कर सेरीज १ चे एंजीन पंपासह ता. २४-६-४९ ला रोख खरेदी घेतलें. एंजिन घेतेवेळेस इतरांनी देशी एंजिन न घेता परदेशी आडवें एंजिन घ्या म्हणून सांगत असतांना त्याकडे दुर्लक्ष करून आपलेंच उभें एंजीन खरेदी केलें. व तो पंपसेट आजतागायत व्यवस्थित चालू आहे.

एंजिन घेऊन जवळ जवळ १० वर्षे होत आली. १० वर्षांत सदर एंजिन ३ वेळा संपूर्ण ओव्हरहॉल करून घेतलें, परंतु त्याचा खर्च एक मोटेपेक्षाही कमी आला.

सदर एंजिनवर १२ एकर बागायत असून दरवर्षी आमचे ६ हजार रुपयांचें उत्पन्न येतें. सदर एंजीन घेतलेपासून आपल्या एजंटाची वेळोवेळी एंजिनची पाहणी करून मोफत सल्ला दिला आहे. माझे एंजिन नफ्यांत असून माझी कसल्याही प्रकारची तक्रार नाही.

सर्व शेतकऱ्यांनी माझ्याप्रमाणेंच एंजिनची निवड करावी; अशी मी आग्रहानें शिफारस करतो.

कळावे, लोभ असावा ही विनंती;

आपला
सदाशिव सुरप्पा सुरवसे

**किर्लोस्कर एंजिनांची गरज**
**किर्लोस्कर एंजिनेंच**
**भरून काढतात !**




**किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि., खडकी, पुणें ३**

KOEL/M-3/59 TOM & BAY

COVER PRINTED BY SADHANA ART PRINTERS BOMBAY-1

अनुक्रमणिका